# सार्थ परमामृत

— भाषांतरकार —

नारायण हरि भागवत



र्णयसागर प्रेस, मुंबई नं. २

त १। रु.

# सार्थ परमामृत



भाषांतरकार —
नारायण हरि भागवत

आवृत्ति सातवी १९४९

निर्णयसागर प्रेस, मुंबई नं. २

किंमत १। रु.



# प्रस्तावना

मूर्ति लहान परंतु कीर्ति मोठी अशा प्रकारचा हा छोटेखानी **मुकुंदराजकृत परमामृत** नांवाचा ग्रंथ आहे. या ग्रंथांत एकंदर १४ प्रकरणें असून त्यांचा विस्तार जरी फक्त ३२३ ओंव्यांत आहे, तरी अर्थप्रमेयानें त्यानें ब्रह्मांडास गवसणी घातली आहे! या ग्रंथांत जशी ज्ञान्याची तशीच अज्ञान्याचीही गति चालते; परंतु आस्थापूर्वक मनन करून ह्या ग्रंथाचे वारंवार पाठ केले पाहिजेत. आणि याप्रमाणें या ग्रंथाचे वारंवार पाठ केले असतां, वाचक सद्भाववृत्तीचा असेल, तर ब्रह्मसाक्षात्काराच्या योग्यतेला येईल, व अन्य प्रसंगीं बहुभाष अथवा मार्मिक वाचाळ होईल, असा या प्रासादिक ग्रंथाचा जागृत प्रभाव आहे. मनुष्यपणांत आल्यावर देहाची वास्तविक अवस्था काय आहे, व त्या अवस्थेवरून त्याची खरोखर किंमत आहे कीं काय, व त्या देहाला लौकिकरूपी अमोलता आणण्याकरितां त्या देहानें कोणत्या प्रकारच्या क्रिया केल्या पाहिजेत, व त्या क्रिया यथास्थितपणें आचरणशुद्ध रीतीनें केल्या असतां देहबुद्धीनें अंगांत कोणत्या प्रकारचें अद्भुत बल निर्माण होतें, मनाला किती अपूर्व प्रकारचा उल्हास वाटत असतो, व त्या योगानें काय पाहिजे तें करण्याच्या शक्तीचा आपल्या अंगांत किती संचार होत असतो, वगैरे अभ्यासानें अनुभवून प्रत्यक्ष या जन्मीं व याच देहांत पाहण्यासारख्या अंतःकरणसुरम्य गोष्टी अनेक आहेत, त्या समजण्यास हा ग्रंथ म्हणजे एक उत्तम साधन झालें आहे. या ग्रंथांत प्रथमतः संप्रदायाप्रमाणें मंगलाचरण म्हणजे गुरुरूपी ईशस्तवन करून दुसऱ्या प्रकरणापासून तों चौदाव्या प्रकरणापर्यंत ईशस्तवनांत प्रतिपादन केलेली गोष्ट प्रत्यक्ष अनुभवानें कशी साक्षात्काराला येऊन पोहोंचते, ती क्रमशः अन्यमतखंडनापासून तों मुक्तिरहस्यापर्यंत सांगितली आहे. आणि शेवटल्या साक्षात्कारप्रकरणांत योगिराज **मुकुंदराज** यांनीं "ह्या बुद्धी जो अनुभविया ॥ तो पाहे परतोनियां ॥ आपुलें स्वरूप ॥" असा आशीर्वाद देऊन ठेविला आहे. तेव्हां हा आशीर्वाद फलद्रूप करून घेण्याची ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं या अद्भुत ग्रंथरसाचें जरूर जरूर सेवन करावें. या ग्रंथरूपी **परमामृताची** गोडी लागल्याकारणानेंच प्रस्तुतचा **सार्थ** प्रकार घडला, योगिराज **मुकुंदराज** यांच्या आशीर्वादाचा तो प्रभाव आहे.




ज्या महात्म्यांच्या चरित्राचा आद्यंत भाग निरंतर गुलदस्तांत असतो, त्यांच्या मध्यचरित्रांतील भाग मात्र अद्भुत विचारांनीं परिपूर्ण असतो, असा एक साधारण नियम असल्यासारखेंच दिसतें. तशाच मासल्याचें **मुकुंदराज**महाराजांचें चरित्र आहे. **मुकुंदराज**महाराजांच्या जन्मस्थानाचा पत्ताच कोठें लागत नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या कुलगोत्राचाही अद्याप कोणाला पत्ता लागलेला नाहीं ! या चरित्रनायकाचा उदय साधुसंतांना कारागृहवासांतून सोडविण्याकरितां झाला अशी परंपरेनें चालत आलेली एक दंतकथा आहे. भरतखंडांत शके ९०० च्या सुमारास **जयत्पाळ** या नांवाचा कोणी एक महापराक्रमी राजा होऊन गेला. त्याला **ब्रह्मस्वरूप** पहाण्याची अतिशय उत्कट इच्छा झाली असल्याकारणानें, जो साधु त्याच्या नगरांत येईल, त्याचें सामोपचारानें यथाविधि षोडशोपचारयुक्त पूजन करून तो अति नम्रतेनें त्या साधूला विनंति करी कीं, "महाराज ! कृपा करून **ब्रह्मस्वरूप**दर्शन मला घडवा." ही राजाची विनंति सफळ झाली नाहीं, म्हणजे राजानें तत्काळ त्या साधूस कारागृहवासांत पाठवून तळें खोदण्याच्या कामावर त्याची नेमणूक करावी. असा क्रम कैक दिवस चालू असल्यानें हजारों साधुसंत कारागृहवासांत पडून तळें खोदण्याच्या कामावर लागले. नंतर एके दिवशीं साधुसंत तळें खोदीत आहेत, राजरक्षक त्यांच्याभोंवतीं व वेशीवर पहारा करीत आहेत, अशा समयास **मुकुंदराज**नामें एक कोमलतनु तेजःपुंज मूर्ति **नारायण**नामाचा गजर करीत करीत **जयत्पाळ** राजाच्या नगराच्या वेशींत शिरली. त्या दिव्य मूर्तीकडे पाहून वेशीवर असलेल्या राजरक्षकांनीं अनेक प्रकारांनीं **मुकुंदराजां**स विनंति केली कीं, "महाराज ! आपल्यासारख्या तेजस्वी कोमलतनूला आमचा राजा कारागृहांत पाठवील, याकरितां आपण नगरांत जाऊं नये." पण **मुकुंदराजांनीं** आपला जाण्याचा आग्रहच दाखविला, आणि निघाले ते थेट राजवाड्यांतच शिरले. इतक्यांत **जयत्पाळाची** आणि

**मुकुंदराजांची** गांठ पडतांच "**ब्रह्म** दाखवा" अशी राजानें त्यांस विनंति केली. लगेच **मुकुंदराजांनीं** सरंजाम घालून घोडा तयार करून आणण्याची राजास आज्ञा केली. राजाज्ञेप्रमाणें घोडा तयार होऊन येतांच **मुकुंदराजांनीं जयत्पाळ** राजास सांगितलें कीं, "राजा, दुसऱ्या रिकिबींत पाय टाकण्यापूर्वी तुला आतां **ब्रह्मस्वरूप**दर्शन करून देतों. रिकिबीवर पाय ठेव." हे **मुकुंदराजां**च्या तोंडचे शब्द ऐकतांच राजानें रिकिबीवर एक पाय ठेवला, आणि दुसरा पाय उचलला; इतक्यांत **मुकुंदराजांनीं** जो एक चाबकाचा सपाटा राजासह घोड्याला मारला, त्याबरोबर घोडा राजासह ठाणावर उभा राहिला, आणि तो सारखा सात दिवस चौकांतच उभा होता. घोड्याची किंवा राजाची हालचाल म्हणून कांहीं नाहीं. अशा प्रकारें राजाची घोड्यावर सात दिवस सारखी समाधि लागल्यावर आठवे दिवशीं समाधि उतरवून **मुकुंदराजांनीं जयत्पाळा**स विचारिलें कीं, "राजा! **ब्रह्मस्वरूप**दर्शन झालें का?" तेव्हां घोड्यावरून खालीं उतरून **जयत्पाळ** राजानें **मुकुंदराजां**स साष्टांग नमस्कार घातला, आणि तो मोठ्या नम्रतेनें व आदरपूर्वक म्हणाला कीं, "महाराज! आपल्या कृपेनें सर्व हेतु परिपूर्ण झाले; काय असेल ती आपली आज्ञा दासास व्हावी." नंतर **मुकुंदराजां**च्या आज्ञेनें **जयत्पाळ**राजानें सर्व साधुसंतांस कारागृहवासांतून सोडवून आणिलें, आणि त्या सर्वांचा मोठा गौरव करून सर्वांना त्यांच्या त्यांच्या इच्छित ठिकाणीं जाण्याची परवानगी दिली. या वेळीं **मुकुंदराजांनीं** जातांना **जयत्पाळ** राजाकरितां **'विवेकसिंधु'** नांवाचा ग्रंथ तयार केला.

उद्धवसुतकृत रामदासचरित्रांत वरील गोष्ट दिली आहे. **मुकुंदराज जयत्पाळा**च्या राजधानींत गेले त्या वेळीं ते चांगले प्रौढ होते असें तेथें लिहिलें आहे. **मुकुंदराजांनीं** आपल्या 'विवेकसिंधु' ग्रंथांत **जयत्पाळाचा** उल्लेख केला आहे, परंतु तो राजा होता असें म्हटलेलें नाहीं; 'नृसिंहाचा बल्लाळु। त्याचा कुमार जयत्पाळु' असे त्यांचे शब्द आहेत. यावरून हा **जयत्पाळ** राजा नसून, कोणी तरी मुमुक्षु पुरुष होता असें दिसतें; व पुणें येथील भारत-इतिहाससंशोधक मंडळाच्या संग्रहीं असलेल्या विवेकसिंधूच्या एका जुन्या हस्तलिखित प्रतींत, उत्तरार्धाच्या ११ व्या अध्यायाच्या शेवटीं,

**शके अकरा दाहोत्तरू। साधारण संवत्सरू।**
**राजा शारंगधरू। राज्य करी॥**

अशी ओंवी आहे, तींत तत्कालीन 'शारंगधर' राजाचा स्पष्ट उल्लेख असल्यामुळें, (ही ओंवी जर क्षेपक नसेल तर) **जयत्पाळ** हा राजा नव्हता असेंच सिद्ध होतें. मात्र,

**मुकुंदराजां**च्या ग्रंथांची भाषा शके १२१२ त झालेल्या ज्ञानेश्वरीच्या भाषेपेक्षां बरीच अर्वाचीन असल्यामुळें, ज्ञानेश्वरीपूर्वी १०० वर्षें, शके १११० त, विवेकसिंधु ग्रंथ लिहिला गेला, हें मान्य करण्यास मन जरासें कचरतें.

'मनोहर अंबानगरी' या शब्दांनीं **मुकुंदराजां**नीं ज्या स्थलाचा उल्लेख केला आहे तें स्थल हल्लींचें जोगाईचें आंबें हेंच होय असें कांहीं लेखकांचें मत असून, तेथें गांवाबाहेर डोंगरांत मुकुंदराजांची समाधि लोक अद्याप दाखवितात. उलट पक्षीं वऱ्हाडांत वैनगंगा नदीचे काठीं 'अंभोर' नामक गांव असून तेथें **मुकुंदराजां**चे आजेगुरु हरिनाथ यांची समाधि आहे व **मुकुंदराजां**चे गुरु रघुनाथ यांचीही समाधि त्याच प्रांतीं छिंदवाडा येथें आहे. शिवाय बैतूलजवळ खेडलें या गांवीं एका पडक्या किल्ल्यांत खुद्द **मुकुंदराजां**ची समाधि आहे अशीही माहिती मिळते. तेव्हां अंभोर हीच अंबानगरी नसेल असेंही म्हणवत नाहीं. **मुकुंदराज, मुकुंदमुनि,** या नांवाचे अनेक सत्पुरुष होऊन गेले असल्यामुळेंही असा घोंटाळा होण्याचा संभव आहे. असो.

असें समजतें कीं, **मुकुंदराजां**च्या पूर्वजांस नांदेड गांवची वंशपरंपरेनें चालत आलेली वृत्ति होती; व तेथील वतनाच्या उत्पन्नाचाही कांहीं भाग त्यांस मिळत असे. **मुकुंदराज** हे माध्यंदिन वाजसनेयी शाखेचे देशस्थ ब्राह्मण. त्यांची गुरुपरंपराः- श्रीआदिनाथ—हरिनाथ—रघुनाथ—मुकुंदराज.



# अनुक्रमणिका







*



# परमामृत

## प्रकरण १ लें

### मंगलाचरण

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

ॐ ॐ

नमो श्रीसद्गुरुनाथा ॥
तूं परमप्राप्तीचा दाता ॥
कृपासिंधु जी समर्था ॥
अनंता अपारा ॥ १ ॥

अहो श्रीसद्गुरुनाथ! आपल्या चरणकमलावर मस्तक ठेवून अनन्यभावानें मी नमन करितों. कां म्हणाल, तर आपण परमप्राप्तीचे दाते आहांत; म्हणजे, आपण जी देणगी देतां, तशी देणगी देण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणाच्याही अंगीं नाहीं; आणि आपण तर केवळ कृपेचे सागरच असून कृपा करण्याविषयीं समर्थ आहांत. इतकेंच नाहीं, परंतु महाराज! आपण अनंत आणि अपार, म्हणजे अंतरहित आणि सीमारहित असे आहांत. (१)

तूं आनंदमय स्वयंप्रकाश ॥
कैवल्यदाता परम ईश ॥
तूं निजरूपें अविनाश ॥
निराकार ॥ २ ॥

आणखी, आपण आनंदमय असून आणि स्वयंप्रकाश अर्थात् स्वतेजानें प्रकाशमान असून कैवल्यदाते म्हणजे मोक्ष देणारे, परम ईश अर्थात् देवाधिदेव आहांत. असे जे आपण, ते निजरूपें म्हणजे आपल्या स्वतःच्या स्वरूपानें अविनाशी असून निराकार आहांत. (२)

तूं निःसंग निरंजन ॥
तूं निरंतर अभिन्न ॥
नाहीं तुजसमान ॥
कोणी देवा ॥ ३ ॥

शिवाय आपण निःसंग अर्थात् इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें न वागणारे म्हणून निरंजन म्हणजे निष्कलंक; आणि निरंतर अभिन्नत्वानें असणारे, म्हणून आपली बरोबरी करणारें, हे सद्गुरुनाथ देवा! दुसरें कोणी नाहीं. (३)

तूं जंव कृपा करिसी ॥
तंव संसारबंधना तोडिसी ॥
अविद्येपासूनि सोडविसी ॥
तारिसी जीवा ॥ ४ ॥

त्या अर्थी, हे सद्गुरुनाथा! आपणच कृपा कराल, तर अविद्येपासून सोडवून संसारबंधन तोडाल, आणि जीवाचा तरणोपाय होईल. (४) कारण–

न होय जें देवां असुरां ॥
तें तुझें करणें दातारा ॥
समर्थ न देखों दुसरा ॥
तुजवांचुनी ॥ ५ ॥

हे उदार सद्गुरो! जें कार्य देव आणि असुर यांच्यानें होण्यासारखें नाहीं, असें कार्य आपण सहज करितां. आपल्याशिवाय माझा उद्धार करण्याविषयीं समर्थ असा दुसरा कोणी दिसत नाहीं. (५)

आणिका कवणा नमस्कारूं ॥
कवणाचें स्तवन करूं ॥
जयजयाजी श्रीगुरु ॥
अगाधमहिमा ॥ ६ ॥

तर हे सद्गुरो! मी आपल्यावांचून दुसऱ्या कोणाला नमस्कार करूं? अथवा दुसऱ्या कोणाचें स्तवन करूं? म्हणून हे अगाध-महिमा श्रीगुरो! मी आपलाच जयजयकार करितों. (६)

जैसा सर्व पटामाजी एक तंतू ॥
तैसा तूं विश्वीं विश्वभरितु ॥
सर्व व्यापूनि विरहितु ॥
अलिप्त तूं ॥ ७ ॥

महाराज! सर्व वस्त्रामध्यें जसा एक तंतूच भरलेला असतो, त्याप्रमाणें आपण विश्वांत विश्वमय भरून आहांत. आणि त्यांत नवल हें कीं, सर्व विश्वाला व्यापून देखील आपण विश्वरहित अलिप्त असे आहांत. (७)

हीं अनेक सगुण रूपें ॥
तूं धरिसी आपुलेनि व्यापें ॥

महाराज! आपण सर्वव्यापी असल्यानें अर्थात् आपल्या व्यापाच्या योगानें निरंतर अनेक सगुणरूपें धारण करितां आणि त्यांत शिव-

शिवशक्तींचीं साकाररूपें ॥
दाविसी तूं ॥ ८ ॥

शक्तींचीं म्हणजे देव आणि देवी यांचीं साकाररूपें दाखवितां अथवा धारण करितां. (८)

तुजविण अन्य न देखों कोणी ॥
म्हणोनि आणिकातें न मानीं ॥
हा मस्तक तुझिये चरणीं ॥
ठेविला सत्य ॥ ९ ॥

या सर्व प्रकारावरून, हे सद्गुरो! आपल्यावांचून मला तर दुसरा कोणीच योग्य दिसत नाहीं. म्हणून दुसऱ्या कोणाला न मानितां, खरोखर मी आपल्याच चरणांवर मस्तक ठेवितों. (९)

तूं शुद्धात्मा स्वयंज्योती ॥
तुझी सर्वत्र ज्ञानदीप्ती ॥
नमो नमो जी श्रीगुरुमूर्ती ॥
आनंदविभो ॥ १० ॥

महाराज! आपण स्वयंज्योति शुद्धात्म असल्यानें सर्वत्र आपली ज्ञानदीप्ती आहे. अशा आनंदविभो श्रीगुरुमूर्ते! आपल्याला मी पुनःपुन्हां नमस्कार करितों. (१०)

तूं ब्रह्मारूपें उत्पत्ति करिसी ॥
विष्णुरूपें प्रतिपाळिसी ॥
रुद्ररूपें संहारिसी ॥
पुनरपि रचावया ॥ ११ ॥

महाराज! ब्रह्मदेवरूपानें आपण सृष्टीची उत्पत्ति करितां, विष्णुरूपानें तिचें प्रतिपालन करितां, आणि पुन्हां सृष्टीची रचना करण्याच्या हेतूनें रुद्ररूपानें तिचा संहार करितां. (११) त्या अर्थीं—

तूं सर्वसाक्षी सर्वज्ञ ॥
तूं सर्वविद्याविद प्राज्ञ ॥
तूं तत्त्वार्थें जीवसंज्ञ ॥
सर्वेश्वर ॥ १२ ॥

महाराज! आपण सर्वसाक्षी आणि सर्वज्ञ आहांत; त्याचप्रमाणें सर्व विद्यांचे आपण जाणते अर्थात् गुरु आहांत. परंतु तत्त्वार्थानें, हे सर्वेश्वरा श्रीगुरुराया! आपल्याला जीव अशी संज्ञा आहे. (१२)

तूं जाणसी स्वरूपासी ॥
म्हणोनि जाणीव स्फुरविसी ॥
परमात्मा म्हणविसी ॥
यया उपाधीस्तव ॥ १३ ॥

महाराज! आपण स्वरूपाला जाणतां म्हणून जाणीव प्रगट करितां. आणि ही जाणिवेची उपाधि लागल्याकारणानेंच आपण आपल्याला परमात्मा म्हणवून घेतां. (१३)

तुझिये इच्छेच्या विस्तारू ॥
विस्तारलें हें चराचरू ॥
जीवअंश अपारू ॥
स्फुरसी तूंचि ॥ १४ ॥

आपल्या इच्छेचा जो विस्तार, तोच चराचररूपानें विस्तारला असून, त्यांत जीव-अंशानें आपणच स्फुरत आहांत. (१४) त्या अर्थी–

सर्व जीवांची ज्ञप्तिकळा ॥
जगासी जाणे सकळा ॥
तो ज्ञानात्मा जिव्हाळा ॥
त्वंपदाचा तूं ॥ १५ ॥

सकळ जगाला जाणणारी व सकळ जीवांत जीवअंशानें असणारी जी ज्ञप्तिकला, त्या कलेचा शिवरूप जिव्हाळा, हे सद्गुरुराया! आपणच आहांत. (१५)

मायाअविद्यासंबंधें ॥
जीव ईश्वर होसी भेदें ॥
हाही आपुलेनि विनोदें ॥
खेळ तुझा ॥ १६ ॥

म्हणून माया आणि अविद्या यांच्याशीं आपला संबंध जडल्यानें जीवईश्वरपणाचा भेद दाखविणारा खेळही आपलाच एक विनोद आहे! (१६)

तूं स्वानंद सदोदित ॥
असिपदीं तदात्मा अलिप्त ॥
पदातीत स्वयंभरित ॥
कैवल्य तूं ॥ १७ ॥

तथापि ब्रह्मरूप असे आपण नित्य स्वानंद-पूर्ण असून असिपदांतही अलिप्त असतां, त्या अर्थी आपली स्वयंभरित कैवल्यस्थिति पदातीत आहे. (१७)

ऐसी करितां तुझी स्तुती ॥
मुकावल्या वेदश्रुती ॥
मग मी प्राकृत किती ॥
वर्णावया योग्य तुज ॥ १८ ॥

महाराज! ज्यापेक्षां वेदांनीं अशी नाना प्रकारें आपली स्तुति करून मौन धारण केलें आहे, त्यापेक्षां त्यांच्यापुढें आपलें वर्णन करण्याची माझी प्राकृताची काय योग्यता असणार? (१८) असें जरी आहे तथापि—

तूं प्रेमभरित परम पुरुष ॥
चतुर्विध वाचेचा ईश ॥

महाराज! आपण प्रेमभरित परमपुरुष असून चतुर्विध वाचेचे ईश अर्थात् स्वामी आहांत, त्या अर्थी आपल्याला जाणण्याबद्दल

आतां देईं देवा मतिप्रकाश ॥
तुज जाणावया ॥ १९ ॥

माझ्या मतीला आपण प्रकाशित कराच. (१९) कारण–

तूं कृपासिंधु जरी वरद होसी ॥
तरी अज्ञान जीवाचें फेडिसी ॥
मग लोपलें प्रगटविसी ॥
शिवत्व सिद्ध ॥ २० ॥

आपण कृपासिंधु आहांत, म्हणून आपण जर वर दिलात, तर जीवाच्या ठायीं असलेल्या अज्ञानाचा नाश करून लोपलेलें शिवत्व सहज प्रगट कराल. (२०)

म्हणोनि मी विनवीं शरणागत ॥
तूं ज्ञानसूर्य हृदयीं उदित ॥
तरी अविद्यातम क्षणांत ॥
फिटेल स्वामी ॥ २१ ॥

या हेतूनें मी आपल्याला शरण येऊन विनंति करीत आहें. महाराज! आपण माझ्या हृदयमंदिरांत ज्ञानसूर्याचा उदय कराल, तर अविद्यारूप तमाचा क्षणार्धात संहार होईल. (२१)

यावरी श्रीगुरु झाले प्रसन्न ॥
करविती परमार्थाचें कथन ॥
बोलेन सकल शास्त्रांचें मथन ॥
निर्वाण तेंचि ॥ २२ ॥

अशी प्रार्थना करितांच श्रीगुरु प्रसन्न झाले, आणि परमार्थाचें निरूपण करण्यास त्यांनीं मला आज्ञा केली. त्या आज्ञेच्या जोरावर सर्व शास्त्रांचें मथन करून त्यांतील निर्वाण तेंच मी आतां सांगतों. (२२)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते मंगलाचरणं नाम
प्रथमप्रकरणं संपूर्णम् ॥ १ ॥



# प्रकरण २ रें

## अन्यमतखंडण

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

जें जाणोनि सर्व कीजे ॥
जें सर्वदा अभ्यासिजे ॥
जेथें परतोनि चित्तें राहिजे ॥
बुडी देउनी ॥ १ ॥

जें समजून घेतल्यावर कांहीं करणें तें सर्व करावें, आणि जें जाणल्यानंतर त्याचा अभ्यास करतां यावा म्हणून ज्यांत चित्तानें परतून बुडी देऊन राहिलें पाहिजे, (१)–

जें अभ्यंतरींचें ज्ञान ॥
प्रगट बोलेन साधन ॥
जेथें रतले योगिजन ॥
निरंतर ॥ २ ॥

असें जें अभ्यंतरींचें ज्ञान, आणि ज्या ज्ञानांत योगिजन निरंतर रममाण झाले, तें साधनासह मी आतां स्पष्ट सांगतों. (२)

जैसें सागरींचें अमृत ॥
कां पय मथूनि काढिजे नवनीत
तैसें सार सर्वांत ॥
तेंचि सांगेन ॥ ३ ॥

तें अशा प्रकारचें सांगतों कीं, देवदैत्यांनीं सागराचें मंथन करून त्यांतून जसें अमृत काढलें, अथवा दुधाचें मंथन करून त्यांतून जसें लोणी काढावें, त्याप्रमाणें सर्वांत सार असें जें कांहीं, तेंच आतां मी सांगतों. (३) म्हणून–

नलगे यापरतें कांहीं करणें ॥
नाना परींचीं अभ्यासनें ॥
संकल्पविकल्पात्मक साधनें ॥
सर्व त्यजिजे ॥ ४ ॥

पहिल्यानें एवढेंच करा कीं, नाना प्रकारचे शास्त्राभ्यास अथवा संकल्पविकल्पात्मक जीं साधनें आहेत, त्या सर्वांचा त्याग करा.(४)

संकल्पविकल्पात्मक मतें ॥
नाना दर्शनें कष्ट ते ॥
जंव महावाक्यविवरण चित्तें ॥
अनुभविलें नाहीं ॥ ५ ॥

कारण, महावाक्याचें विवरण म्हणजे त्वं, तत् आणि असि या तीन पदांचें ऐक्य जोंपर्यंत चित्तानें अनुभविलें नाहीं, तोंपर्यंत संकल्पविकल्पात्मक मतें आणि नाना प्रकारचीं शास्त्रें हीं सर्व कष्टमय असतात. (५)

जों निरुपाधिस्वरूप ॥
अनुभविलें नाहीं आपेंआप ॥
तोंवरी कष्टासि माप ॥
कवण करी ॥ ६ ॥

आणि निरुपाधिस्वरूप जोंपर्यंत सहजीं अनुभवलें नाहीं, तोंपर्यंत जे कष्ट होतात, त्यांची गणनाही होत नाहीं. (६)

व्रतें तपें नियमांचिया सांकडीं ॥
संदेहीं गुंतलीं बापुडीं ॥
तीं केवीं पावतील पैलथडी ॥
संसारसागराचिये ॥ ७ ॥

व्रतें आणि तपें हीं नियमांच्या योगानें खडतर झालीं असून फलप्राप्तीविषयीं संशयात्मक असल्यानें संसारसागराच्या पैलतीरावर तीं बापडीं कशीं पोहोंचतील ? (७)

पूजा स्नानें तीर्थीं दानें ॥
मंत्र यंत्र योग हवनें ॥
कीजे तितुकें फळ भोगणें ॥
स्वर्गादिक सर्वथा ॥ ८ ॥

पूजा, तीर्थावर स्नानें व दानें, त्याचप्रमाणें मंत्र, यंत्र, योग आणि हवनें इत्यादि प्रकार जितके करावे, तितकेच त्यांपासून स्वर्गसुखादि भोग प्राप्त होतात. (८) आणि–

जप तप अनुष्ठानें ॥
आणि नानापरींचीं साधनें ॥
मोक्ष न पाविजे आत्मज्ञानें- ॥
वांचोनियां सर्वथा ॥ ९ ॥

जप, तप, अनुष्ठान आणि नाना प्रकारचीं साधनें जरी केलीं, तथापि आत्मज्ञानावांचून मोक्षप्राप्ति होत नाहीं. (९) कारण–

जोंवरी जीवेश्वर उपाधी ॥
निरसूनि नेणिजे ऐक्यसिद्धी ॥
भेद सांडूनि शबलविरोधी ॥
शुद्ध स्वरूप न प्रकाशे ॥ १० ॥

जोंपर्यंत जीव आणि ईश्वर या उपाधींचा निरास झाला नाहीं, व जीव-शिवांचें ऐक्य लक्ष्यांत आलें नाहीं, तोंपर्यंत भेदबुद्धि मोडून मायेनें अनावृत असें शुद्ध स्वरूप प्रकाशमान होत नाहीं. (१०)

त्वंपद तत्पदींचें लक्ष ॥
शबल सांडोनि परोक्ष ॥
नेणिजे शुद्ध अपरोक्ष ॥
तंववरी मोक्ष कैंचा ॥ ११ ॥

उघडच आहे कीं, जीवाचें शिवाच्या ठिकाणीं लक्ष लागणें हा शबल भाग नाहींसा होऊन शुद्ध ब्रह्मपद प्रत्यक्षत्वानें जोंपर्यंत जाणलें नाहीं, तोंपर्यंत मोक्षप्राप्ती कशी होणार ? अर्थात् नाहीं. (११)

जोंवरी तो एक मी एक ॥
हा न तुटेचि कलंक ॥
जंव न प्रकाशे सम्यक ॥
तंव परमप्राप्ति न घडे ॥ १२ ॥

त्याचप्रमाणें जोंपर्यंत तो एक आणि मी एक अर्थात् त्याच्यापासून मी निराळा असला कलंकयुक्त दोष नाहींसा झाला नाहीं, आणि सम्यग्ज्ञानाचा प्रकाश झाला नाहीं, तोंपर्यंत परमप्राप्तीचा योग प्राप्त व्हावयाचा नाहीं. (१२)

जंववरी त्रिपदशोध न घडे ॥
अर्धमात्रापरतें न सांपडे ॥
क्षराक्षरनिवाडा न घडे ॥
उत्तम पुरुषीं समरस ॥ १३ ॥

आणि जोंपर्यंत त्रिपद अर्थात् त्वं, तत् आणि असि या पदांचा उलगडा झाला नाहीं, आणि अर्धमात्रेपलीकडील म्हणजे उन्मनी स्थिति प्राप्त होऊन क्षर आणि अक्षर पुरुषांचा निवाडा लागून उत्तम पुरुषाच्या ठिकाणीं ऐक्यभाव झाला नाहीं, (१३)

सच्चिदानंदविवरण ॥
जंव नेणिजे कार्यकारण ॥
विवळेना शुद्ध आत्मज्ञान ॥
तंव मोक्ष कैंचा ॥ १४ ॥

आणि सच्चिदानंद-पदांतील कार्यकारण-भाव समजला नाहीं, तोंपर्यंत शुद्ध आत्मज्ञान होत नाहीं, व आत्मज्ञान नाहीं तोंपर्यंत मोक्षप्राप्ती कशी होणार? (१४)

सद्गुरुमुखें वेदांतश्रवण ॥
न घडे तयाचें मनन ॥
जंव न पाविजे निजध्यासन ॥
तंववरी मोक्ष कैंचा ॥ १५ ॥

म्हणून मोक्षप्राप्ती करून घेण्याकरितां सद्गुरूच्या मुखानें वेदांतश्रवण, श्रवण केले-ल्याचें मनन, आणि केलेल्या मननाचा सारखा निजध्यास लागला नाहीं, तोंपर्यंत मोक्षप्राप्ती होणार नाहीं. (१५)

सांडूनि वेदांत सिद्धांत ॥
जे कां बोलती पाखांडमत ॥
त्यांची नायकावी मात ॥
महावाक्यार्थ अनुभविजे ॥ १६ ॥

वेदांतसिद्धांत सांगण्याचें सोडून जे पाखांडाच्या गोष्टी बोलतील, त्यांची एकही गोष्ट न ऐकतां महावाक्यार्थाचा म्हणजे त्वं आणि तत् पदांचें ऐक्य करून असिपदाचा अनुभव घेत जावा. (१६)

वेद बोलिला सृष्टिक्रम ॥
तो सांडूनि सकळ धर्म ॥

वेदांनीं जो सृष्टिक्रम सांगितला आहे, तो सर्व धर्म सोडून त्यांत जें सकल वेदांताचें निजवर्म

वेदांताचें निजवर्म ॥
लाहिजे गुरुमुखें ॥ १७ ॥

सांगितलें आहे, त्याची गुरुमुखानें प्राप्ति करून घ्यावी. (१७)

वेदांताचें अबोलणें ॥
सिद्धांतींचें जाणोनि नेणणें ॥
जेथें मिळणी होय तें पावणें ॥
कैवल्यपद ॥ १८ ॥

कारण बोलून बोलून थकल्यावर वेदांनीं ज्या ठिकाणीं मौन धारण केलें, आणि सिद्धांत जाणून ज्या ठिकाणीं नेणीव धरली, अर्थात् ज्ञान आणि अज्ञान या दोहींचाही निरास झाला, त्या ठिकाणीं जाणीव आणि नेणीव यांची मिळणी झाली. त्या मिळणीचेंच नांव कैवल्यपद. तें पद गुरूपासून प्राप्त करून घ्यावें. (१८)

जीवेश्वराची मिळणी ॥
होय परमपद निर्वाणीं ॥
तेथें द्वैतबुद्धीची कडसणी ॥
तुटोनि जाय ॥ १९ ॥

अशा प्रकारें जीव-ईश्वरांची मिळणी होऊन निर्वाण परमपदाची प्राप्ति झाली असतां द्वैतबुद्धीची कडसणी म्हणजे गांठ तुटून जाते. (१९)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अन्यमतखंडनं नाम
द्वितीयप्रकरणं संपूर्णम् ॥ २ ॥



*

# प्रकरण ३ रें

## महावाक्यविवरण

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

करूनि आदिशक्तीचा अंगिकारू
जो करी उत्पत्ति स्थिति संहारू ॥
सर्वसाक्षी सर्वेश्वरू ॥
तो शबल बोलिजे ॥ १ ॥

आदिशक्तीचा अर्थात् जगन्मातेचा अंगिकार करून जो सृष्टीची उत्पत्ति, स्थिति आणि संहार करितो, व जो सर्वसाक्षित्वानें सर्व देवांचा ईश्वर सर्वेश्वररूपानें नांदतो, त्याला शबल म्हणतात. (१)

स्थूळ दृष्टीचें जाणणें ॥
तितुकेंही निरसणें ॥
उरे अदृश्य जो द्रष्टेपणें ॥
तोचि शुद्ध परमात्मा ॥ २ ॥

परंतु ह्या शबल सर्वेश्वररूपांत स्थूळ दृष्टीनें जाणतां येणाऱ्या रूपाचा निरास केल्यावर अदृश्यपणानें जें रूप द्रष्टेपणें अनुभवानें गोचर होतें, तें परमात्म्याचें शुद्ध स्वरूप होय. (२)

सर्वज्ञ आणि सर्वेश्वरू ॥
ऐसा सकळ शास्त्रांचा निर्धारू ॥
तोचि जाणिजे परात्परू ॥
ज्ञप्तिमात्र ॥ ३ ॥

आणि ह्याच स्वरूपाविषयीं सकल शास्त्रांनीं सर्वज्ञ आणि सर्वेश्वर असा निर्णय केला आहे, व ह्याच स्वरूपाला ज्ञप्तिमात्र परात्पर म्हणतात. (३)

अनंत शक्तींचा द्रष्टा ॥
स्थान मान विरहित प्रतिष्ठा ॥
जया अपरिमित घनदाटा ॥
पार नेणिजे ॥ ४ ॥

असा तो परमात्मा अनंत शक्तींचा द्रष्टा असून स्थान (रहाण्याची जागा), मान (इयत्ता) आणि प्रतिष्ठा यांविरहित असा अपरिमित घनदाट आहे, व ज्याचा कांहीं केल्या अंतच लागत नाहीं. (४)

तया बोलिजे शुद्ध ॥
निरसिजे शबलत्व अशुद्ध ॥
ज्ञानघनानंदसिद्ध ॥
परमेश्वर ॥ ५ ॥

त्याला शुद्धस्वरूप अथवा शुद्धात्मा म्हणतात. म्हणून ही शुद्धस्वरूपप्राप्ति झाली असतां शबलत्वाचें निरसन होऊन ज्ञानघनानंदसिद्ध परमेश्वररूप बनतें. (५)

ब्रह्मांड हिरण्यगर्भ माया ॥
जो वेगळा या देहत्रया ॥
मूळप्रकृति महामाया ॥
यांविलक्षण जो ॥ ६ ॥

हा परमेश्वररूपी आत्मा ब्रह्मांड, हिरण्यगर्भ आणि माया म्हणजे अनुक्रमें जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या देहाच्या ज्या तीन अवस्था आहेत, त्यांपासून वेगळा असून मूळप्रकृति जी महामाया, तिच्याहूनही हा अगदीं निराळा आहे. (६)

उत्पत्ति स्थिति संहार ॥
सर्वसाक्षित्वाचा व्यवहार ॥
या अवस्थातीत अपार ॥
आपेंआप जो ॥ ७ ॥

त्याचप्रमाणें सर्वसाक्षित्वाचे व्यवहार जे उत्पत्ति, स्थिति आणि संहार या व्यवहारांहून तो अतीत अर्थात् अगदीं बाहेर आहे. (७)

ब्रह्मा विष्णु रुद्र ॥
आणि चौथा हा सर्वेश्वर ॥
यांवेगळा अपरंपार ॥
शुद्ध ब्रह्म जो ॥ ८ ॥

त्याचप्रमाणें ब्रह्मा, विष्णु, रुद्र आणि चौथा सर्वेश्वर या सर्व देवांच्याहूनही अगदीं वेगळा असून तो अपरंपार मर्यादातीत असा शुद्ध ब्रह्मस्वरूप आहे. (८)

याचिपरी पाहतां ॥
जीव अविद्याविरहिता ॥
काम्यकर्मातीता ॥
जाणिजे ऐसा ॥ ९ ॥

या पद्धतीनें पाहूं गेलें असतां असें लक्षांत येतें कीं, जीव हा अविद्यारहित असून काम्यकर्मातीत म्हणजे काम्यकर्माच्या बाहेर आहे; अर्थात् जीव त्यांनीं लिप्त नाहीं. (९)

स्थूळ सूक्ष्म कारण ॥
चौथा देह महाकारण ॥
जागृती स्वप्न सुषुप्ती जाण ॥
तुरीया चौथी ॥ १० ॥

स्थूळ, सूक्ष्म, कारण आणि महाकारण असे ज्याप्रमाणें चार प्रकारचे देह आहेत; त्याचप्रमाणें जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुर्या ह्या चार अवस्था अनुक्रमें चार देहांच्या आहेत. (१०)

विश्व तैजस प्राज्ञ ॥
प्रत्यगात्मा सर्वज्ञ ॥
हे अभिमानी संज्ञ ॥
शबल त्वंपदार्थी ॥ ११ ॥

या चार देहांच्या चार अवस्थांचे विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यगात्मा अथवा सर्वज्ञ असे अनुक्रमें त्वंपद अर्थानें म्हणजे जीव अथवा मीपणाचे चार शबल अभिमानी आहेत. (११)

या इतुकियांचा द्रष्टा ॥
तो ज्ञानघन तया प्रगटा ॥
शुद्ध बोलिजे प्रतिष्ठा ॥
जीवत्व निरासे ॥ १२ ॥

या चार देहांचा, चार अवस्थांचा व चार अभिमानांचा जो द्रष्टा, त्यानें जीवत्वाचा निरास केला म्हणजे तोच ज्ञानघन शुद्ध आत्म्याच्या प्रतिष्ठेस अर्थात् योग्यतेस येऊन प्रगट होतो. (१२)

शबल तो वाच्यपक्ष ॥
शुद्ध बोलिजे लक्ष ॥
लक्षीं ऐक्य जाणितल्या मोक्ष- ॥
सिद्धीचि लाभे ॥ १३ ॥

म्हणून वाच्यपक्ष म्हणजे जितका बोलण्याचा भाग, तितका शबलपक्ष असून लक्षानें अर्थात् एकाग्र अंतःकरणानें घेण्याचा तितका भाग शुद्ध पक्ष होय आणि त्या शुद्धपक्षांश भागांत जीवशिवांचें ऐक्य होण्याबरोबर मोक्षसिद्धि लाभते. (१३)

दोन्ही नयनीं एक दृष्टी ॥
दोन्ही श्रवणीं एक नाद उठी ॥
दोन्ही ऊर्ध्वाधरपुटीं ॥
एकचि शब्द ॥ १४ ॥

डोळे दोन, परंतु त्यांतील दृष्टि एक; कान दोन, परंतु त्यांत उठणारा नाद एक; ऊर्ध्व व अधर ओंठ दोन, परंतु त्यांपासून निघणारा शब्द एक. (१४)

तैसें दोन्ही पदींचें विवरण ॥
करितां जीवेश्वराचें निरसन ॥
शुद्ध लाधे तया कवण ॥
द्वैत कल्पी ॥ १५ ॥

त्याप्रमाणें जीव व शिव या दोन पदांचें विवरण करीत असतां त्यांत जीव व ईश्वर या दोन पदांचें निरसन होऊन त्यांतच शुद्धपद सांपडल्यावर मग द्वैताची कल्पना कशी होणार ? (१५)

जैसें महदाकाश अखंड पूर्ण ॥
घटमठीं दिसे भिन्न ॥
घटमठाकाश ऐसें जाण ॥
बोलती तया ॥ १६ ॥

याला दृष्टांत असा पहा कीं, महदाकाश हें अखंड पूर्ण म्हणजे सर्वत्र व्यापलेलें आहे. अर्थात् आकाश कोठें नाहीं असें स्थळच नाहीं. असें असतां घट म्हणजे भांडें आणि मठ म्हणजे आश्रम या दोहींतील अवकाशाला घटाकाश व मठाकाश असें म्हणतात. (१६)

ते घट मठ दोन्ही भंगतां ॥
ठायींचेंचि ऐक्य तत्त्वतां ॥
तैसें जीवेश्वर उपाधी निरसतां ॥
स्वस्वरूप एक ॥ १७ ॥

त्याच घटाचा आणि मठाचा भंग होतांच घट व मठ या आकाशाच्या उपाधी जाऊन जसें मूळचेंच ऐक्य होतें, तद्वत् जीव आणि ईश्वर या उपाधींचा निरास होतांच मूळचेंच स्वरूप राहातें. (१७)

माया-अविद्या-नाशीं ॥
ऐक्य होय जीवेश्वरांसी ॥
ऐसें बुझोनियां मानसीं ॥
सुखिया होइजे ॥ १८ ॥

म्हणून माया आणि अविद्या यांच्या नाशाबरोबर जीव आणि ईश्वर यांचें ऐक्य होतें असें मनांत समजूं लागतांच सुख वाटूं लागतें. ( १८ )

माया-अविद्येसी पाहतां ॥
विरोध भासे उभयतां ॥
म्हणोनि शबलत्यागें शुद्ध घेतां ॥
अखंड एकरस ब्रह्म ॥ १९ ॥

परंतु माया आणि अविद्या या दोहींविषयीं विचार करितां त्या शबल म्हणजे आत्मस्वरूप-प्राप्तीविषयीं विरोधी असल्यानें त्यांचा त्याग करून जेव्हां शुद्धाचा अंगीकार करावा, तेव्हां अखंड-एकरसब्रह्मस्थिति होते. (१९)

ऐसेनि महावाक्यविवरणें ॥
त्वंपद तत्पद शोधणें ॥
असिपदीं पावणें ॥
ऐक्यसिद्धी ॥ २० ॥

अशा प्रकारें महावाक्याचें विवरण म्हणजे त्वं आणि तत् या दोन पदांचें शोधन करून असिपदप्राप्तीनें ऐक्यसिद्धि प्राप्त करावी.(२०)

म्हणोनियां दृष्टीविण ॥
सकळ भेदमतें जाण ॥
तें बोलिजे खंडज्ञान ॥
मायिक व्यवहार ॥ २१ ॥

अर्थात् या विचाराशिवाय इतर सर्व भेदमतें म्हणून जितकीं आहेत, तीं मायिक व्यवहाराचीं असल्यानें अखंड ज्ञानप्राप्तीचीं नाहींत. (२१)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते महावाक्यविवरणं नाम तृतीयप्रकरणं संपूर्णम् ॥ ३ ॥

# प्रकरण ४ थें

## स्थूलदेहनिरसन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

आतां अद्वैत पहाणें ॥
तें दुसरें करूनियां जाणणें ॥
पुनरपि मुरवणें ॥
ठायींच्या ठायीं ॥ १ ॥

मागच्या प्रकरणाप्रमाणें अद्वैत पहाणें म्हणजे प्रथमतः द्वैत निर्माण करून अद्वैत जाणून अर्थात् समजून घेतल्यावर दृष्टि पुन्हां जागच्या जागीं आणून मुरवावी. (१)

उफराटें दृष्टीचें पहाणें ॥
जे दृष्टीमाजी दृष्टी मुरवणें ॥
पहातया मूळासी जाणें ॥
स्वस्वरूपासी ॥ २ ॥

म्हणजे साहजिक समोरचा झोंक उफराटा करून दृष्टींत दृष्टि मुरवून पाहाणाऱ्या स्वस्वरूपाच्या मूळाशीं जाऊन पहावें. (२)

तेथूनि परतें पाहतां ॥
नाहीं पहाणें सर्वथा ॥
दुमदुमित अखंडिता- ॥
माजी पडिजे ॥ ३ ॥

तें स्वरूप दृष्टीस पडलें असतां त्याच्या पलीकडे पहाणेंच कांहीं उरत नाहीं. कारण स्वस्वरूपापर्यंत एकदां मजल पोंचली, म्हणजे दुमदुमित अशी अखंड स्वरूपमय स्थिति होते. म्हणजे परब्रह्मस्वरूपावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. (३)

जेथें नाहीं माया अविद्या ॥
जे अपरिमित स्वसंवेद्या ॥
ते सांगों ब्रह्मविद्या ॥
सावधान परियेसा ॥ ४ ॥

त्या दुमदुमित अखंड स्वरूपांत मायाअविद्येचा संपर्क नाहीं आणि जें स्वरूप अपरिमित असून स्वसंवेद्य आहे, तें जाणण्याची ब्रह्मविद्या आतां सांगतों, त्यासाठीं अवधान द्या. (४)

जे घनानंद सुखाची राशी ॥
प्रवेशोनि तये स्वप्रकाशीं ॥
असिजे गमनागमनासी ॥
नाशोनि सदा ॥ ५ ॥

ही ब्रह्मविद्या घनानंद म्हणजे अलोट सुखाची राशि असल्यानें तिच्यांत एकदां प्रवेश झाला, म्हणजे प्रवेश करणाऱ्याच्या मनाची जा ये अथवा चलबिचल बंद होऊन तो स्वप्रकाशांतच राहतो. (५)

तें साधावें कवणे रीतीं ॥
जेणें होय नित्यतृप्ती ॥
ते युक्ति ऐकावी सुनिश्चितीं ॥
एकाग्र होऊनि ॥ ६ ॥

त्या विद्येचें साधन कोणत्या रीतीनें केलें असतां नित्यतृप्ति होईल, अशी एक सुनिश्चित युक्ति सांगतों ती एकाग्रतेनें ऐक. ( ६ )

परी आधीं सांगों साधन ॥
आत्मस्वरूपाचें परिज्ञान ॥
तें जाणितल्याविण ॥
काय ध्यावें ॥ ७ ॥

ज्याचें ध्यान करावयाचें तें समजण्याकरितां आत्मस्वरूपाच्या परिज्ञानाचें साधन आधीं सांगतों. नाहींतर तें समजल्यावांचून कशाचें म्हणून ध्यान करावें ? ( ७ ) याकरितां–

आधीं आत्मयातें जाणावें ॥
मग तयातें साधावें ॥
येरवीं नुसतें अनुभवावें ॥
काय धरूनी ॥ ८ ॥

आधीं आत्मस्वरूपाला समजून घ्यावें, आणि मग आत्मा साध्य होईल अशा खटपटीला लागावें; नाहींतर मूळांतच कांहीं समजलें नाहीं तर ध्यान करून अनुभव तरी कशाचा घ्यावयाचा ? ( ८ )

ज्या युक्तीं स्वरूप एक ॥
जाणणें ते बुद्धि ऐक ॥
मी आहें हें तंव निष्टंक ॥
जाणसी तूं ॥ ९ ॥

आतां साधनावर लक्ष दे. ज्या युक्तीनें एकस्वरूप जाणतां येतें, त्या युक्तीचें नांव बुद्धि. त्या बुद्धीनें 'मी आहें', येवढी गोष्ट तूं खात्रीलायक जाणतोस. ( ९ ) म्हणजे–

ऐसें तंव जाणसी ॥
परी मी कोण हें नेणसी ॥
तरी कां आपआपणासी ॥
बुझेसि ना ॥ १० ॥

त्या बुद्धीनें मी आहें एवढें तुला समजतें, परंतु मी कोण आहें हें मात्र तुला समजत नाहीं ! तरी तूं आपल्या स्वतांला कां ओळखूं नयेस ? ( १० )

त्याला कारण आहे. तें हें कीं–

तूं कोण कोठूनि कैंचा ॥
आलागेलासि तरी साचा ॥
परी पालव न धरिसी विचाराचा ॥
आपणा जाणावया ॥ ११ ॥

तूं कोण आहेस ? कोठून आलास ? आणि जाणार कोठें ? इत्यादि गोष्टी समजून घेण्याच्या विचाराचा लवलेशही तुझ्या मनांत येत नाहीं ! ( ११ )

तूं देह कीं देहाचा जाण ॥
देह तुज जाणे कीं तुज याचें ज्ञान
पहातां द्रष्टा तूं आपण ॥
देह तुज दृश्य ॥ १२ ॥

आतां थोडासा विचार कर कीं, तूं देह आहेस किंवा देहजन्य आहेस? अथवा देह तुला जाणतो किंवा तुला देहाचें ज्ञान आहे?–म्हणजे द्रष्टा तूं आणि देह तुला दृश्य आहे असेंच दिसेल. (१२)

देहा सबाह्य अभ्यंतरीं ॥
तूं जाणसी गा विचारीं ॥
देह अलंकाराचे परी ॥
मिरविसी तूं ॥ १३ ॥

आणखी काय होईल कीं, अंतर्बाह्य देहाला तूं जाणतोस, त्या अर्थी अलंकाराप्रमाणें देहाला तूं मिरवतोस असें विचाराअंतीं तुझें तुलाच वाटेल. (१३)

लेवोनि खोळी पंचभूतांची ॥
भूतीं मिरविसी तूंची ॥
जाणीव असे कीं याची ॥
तूजचि कीं ॥ १४ ॥

कारण पांच भूतांनीं तयार केलेली देहरूप खोळ तूं पांघरून त्या पंचभूतांत तूंच मिरवितोस, त्या अर्थी पंचभूतांची जाणीव तुलाच आहे. (१४)

ऐसें आपणिया जाण ॥
निरसी हा दृश्य गुण ॥
जे देह मी म्हणतोसि आपण ॥
ते सांडीं भ्रांति ॥ १५ ॥

मग सहजच देहाचे आपण जाणते झालों, म्हणजे देह मी हा जो दृश्य गुण, त्याचा निरास होतो. म्हणून अज्ञानानें देहाला मी जें म्हणतोस, ती भ्रांति आहे; तेवढी सोड. (१५)

देहाचिया अवयवां समस्तां ॥
तूंचि एक जाणता ॥
तो तुझा तूं आइता ॥
विचारूनि पाहीं ॥ १६ ॥

देहाच्या सर्व अवयवांचा जाणता तूंच आहेस. तो तुझा तूं आइताच आहेस, असेंही पण विचाराअंतीं तुला दिसून येईल. (१६)

रोम त्वचा नाडी मांस ॥
अस्थि हे पंच अंश ॥
कठिण हा धरणीचा भास ॥
जाणसी तूं ॥ १७ ॥

शरीराला चिकटून असणारे रोम, त्वचा, नाडी, मांस आणि अस्थि हे पांच कठीण अंश धरणी म्हणजे पृथ्वीतत्त्वाचे आहेत, ते तूं जाणतोस. (१७)

लाळ मूत्र शोणित ॥
मज्जा रेत हें आप द्रवत ॥
या पांचा अंशांतें निश्चित ॥
जाणता तूं एक ॥ १८ ॥

लाळ, मूत्र, रक्त, मज्जा आणि रेत यांना जलतत्त्व निर्माण करितें. या पांचही अंशांना निश्चितपणें जाणणारा तूंच आहेस. (१८)

क्षुधा तृषा आळस निद्रा ॥
मैथुन हे अंश वैश्वानरा ॥
या पांचांचिया व्यवहारा ॥
जाणसी तूं ॥ १९ ॥

क्षुधा, तृषा, आळस, निद्रा आणि मैथुन हे अंश वैश्वानराचे म्हणजे तेजतत्त्वाचे आहेत. या पांचही अंशांचा व्यवहार तूं जाणतोस. (१९)

चलन धावन निरोधन ॥
प्रसरण आणि आकुंचन ॥
हे चंचल पांचही गुण ॥
वायूचे देखणा तूं ॥ २० ॥

चलन, धावन, निरोधन, प्रसरण आणि आकुंचन हे पांच चंचल गुण वायूचे आहेत. ते पाहणारा तूंच आहेस. (२०)

काम क्रोध शोक जाण ॥
लोभ भय हे पांच गुण ॥
तें आकाशाचें लक्षण ॥
देखणा तूं ॥ २१ ॥

काम, क्रोध, शोक, लोभ आणि भय हे जे पांच गुण आहेत, ते आकाशाचे आहेत. त्यांना पाहणाराही तूंच आहेस. (२१)

ऐसे पंचभूतांचे अंश ॥
जाणसी पंचवीस ॥
ते सर्वही तुज दृश्य ॥
स्थूळ देह हा ॥ २२ ॥

अशा प्रकारानें पांच भूतांचे पंचवीस अंश तूं जाणत असून ते सर्वही तुला दृश्य आहेत. हाच स्थूळ देह होय. (२२)

याचे साही विकार जाण ॥
जायते अस्ति विवर्धन ॥
विपरिणमते वार्धक्य संहरण ॥
यासीच असे ॥ २३ ॥

या देहाच्या सहा अवस्था आहेत, त्या अशा—(१) जायते (उत्पन्न होणें), (२) अस्ति (अस्तित्व असणें), (३) विवर्धन (वाढणें), (४) विपरिणमते (वाढ पूर्ण होणें), (५) वार्धक्य (अपक्षीयते-वृद्धपण) आणि (६) संहरण (नश्यति-नाश). (२३) यांना आणि—

याचे वर्ण-व्यक्तिरूपासी ॥
जाणसी याचिया नामासी ॥
म्हणोनि तुज आत्मयासी ॥
हे विजाती कैंची ॥ २४ ॥

या देहाच्या वर्णाला, व्यक्तिरूपाला आणि नांवाला ज्या अर्थी तूं जाणतोस, त्या अर्थी देह आत्म्यापासून विजाती म्हणजे भिन्न आहे, हा प्रश्न सहजच निघतो. (२४)

तूं आत्मा निराकार ॥
जाणसी या देहाचा आकार ॥
जरी काष्ठीं अग्नि साचार ॥
तरी वेगळा कीं ॥ २५ ॥

तूं आत्मा स्वतः निराकार असून या देहाच्या आकाराला जाणणारा आहेस. ज्याप्रमाणें काष्ठांत खरोखर अग्नि असतो, तरी तो काष्ठापासून जसा वेगळा असतो,– (२५)

तैसा तूं यासी व्यापूनि ॥
अससी या स्थूळातें भरूनि ॥
रोमांच आदि अग्र करूनि ॥
जाणता तूं ॥ २६ ॥

त्याप्रमाणें तूं या स्थूळ देहाला सर्वत्र व्यापून भरलेला असल्याकारणानें केंसांच्या आदि अग्राला देखील तूं जाणतोस. (२६)

परी हा तुज नेणे ॥
तूंचि अससी जाणपणें ॥
तो तूं आत्मा आपण ॥
नव्हसी नरनारी ॥ २७ ॥

परंतु हा स्थूळ देह मात्र तुला जाणत नाहीं. कारण जाणीवरूपानें तूंच आहेस. आणि जाणपणा हाच जो तूं आत्मा, त्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं स्थूळांत दिसणारा नरनारीभाव नाहीं. (२७)

आत्मयाचेनि जागेपणें ॥
बाह्य व्यापार करणें ॥
इंद्रियद्वारा भोगणें ॥
विषयांचें घडे ॥ २८ ॥

तथापि आत्मस्वरूपाच्या जागृतीमुळें बाह्य व्यापार करितां येतात, आणि इंद्रियद्वारा विषयांचे उपभोग घेतां येतात. (२८)

मी अमुका नामरूपाचा ॥
ऐसा हा अभिमान विश्वाचा ॥
तूं जाणता या सर्वांचा ॥
विलक्षण आत्मा ॥ २९ ॥

म्हणून मी अमुक नांवरूपाचा आहें, असा हा विश्वाचा अभिमान दिसून येतो. ह्या सर्वांचा जाणता तूं एक विलक्षणच आत्मारूप आहेस. (२९)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते स्थूलदेहनिरसनं नाम चतुर्थप्रकरणं संपूर्णम् ॥ ४ ॥

---

# प्रकरण ५ वें

## लिंगदेहनिरसन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

तुज श्रवणांतूनि ऐकणें ॥
त्वचेंतूनि स्पर्श घेणें ॥
नयनांतूनि देखणें ॥
नाना रूपांतें ॥ १ ॥

तूं कानांनीं ऐकतोस, त्वचेनें स्पर्श घेतोस आणि डोळ्यांनीं नानाप्रकारचीं रूपें पहातोस. (१) त्याचप्रमाणें—

जिव्हेंतूनि स्वाद घेसी ॥
घ्राणांतूनि परिमळ जाणसी ॥
वाचेंतूनि उच्चारिसी ॥
अक्षरें सर्व ॥ २ ॥

जिभेनें स्वाद घेतोस, नाकानें वास ओळखतोस, आणि वाचेनें सर्व अक्षरांचा उच्चार करतोस. (२) त्याचप्रमाणें—

करांतूनि देणें घेणें ॥
पायांतूनि चालणें ॥
शिश्नांतूनि रति भोगणें ॥
गुदीं मळविसर्ग ॥ ३ ॥

हातांच्या योगानें देणेंघेणें करतोस, पायांनीं चालतोस, शिश्नद्वारा रतिभोग करतोस, आणि गुदद्वारानें मलविसर्जन करतोस. (३)

या इंद्रियांतूनि तूंचि जाण ॥
प्रकाशसी आड ठाकोन ॥
तो तूं इंद्रियांसी विलक्षण ॥
साक्षीरूप ॥ ४ ॥

अशा प्रकारें तूं आड राहून इंद्रियद्वारा आपलें अस्तित्व प्रकट करितोस. तो तूं या इंद्रियक्रियांना विलक्षण साक्षीरूप आहेस. (४)

श्रवण स्पर्शन दर्शन ॥
आस्वादन अवग्रहण ॥
या ज्ञानेंद्रियेंकरून ॥
पांचही विषय ॥ ५ ॥

श्रवण, स्पर्शन, दर्शन, आस्वादन आणि अवग्रहण या पंचज्ञानेंद्रियांनीं सर्व विषयांचे पांच प्रकार झाले आहेत. (५) म्हणजे—

शब्द स्पर्श रूप रस गंध ॥
वचनादान गमनानंद ॥
मलविसर्ग हे पंचविध ॥
कर्मेंद्रियां जाणता तूं ॥ ६ ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पांच विषयांत सर्व विषयांचा समावेश होतो. आणि बोलणें, घेणें, चालणें, आनंद आणि मलविसर्ग हीं पांच कर्मे आहेत. म्हणजे विषयांसह पंचज्ञानेंद्रियें आणि क्रियेसह पंच-कर्मेंद्रियें यांचा जाणता तूं आहेस. (६)

प्राणापान व्यान ॥
उदान आणि समान ॥
यांचीं स्थानें स्थिति संपूर्ण ॥
जाणसी तूंचि एक ॥ ७ ॥

त्याचप्रमाणें प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान या पांच प्रकारच्या वायूंचीं स्थानें आणि स्थिति यांना सर्व प्रकारें जाण-णारा तूंच एक आहेस. (७)

अंतःकरण मन बुद्धि ॥
चित्त अहंकार या पांचां भेदीं ॥
स्फुरसी जाणसी तूं आदीं ॥
ठायींचाचि उभा ॥ ८ ॥

त्याचप्रमाणें अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार या पांच भेदांनीं स्फुरण होणारा व जाणणारा जो, तो तूं आधींपासू-नच म्हणजे जसा कांहीं स्वयंभूच उभा आहेस. (८)

अंतःकरणींचा आठव सपूर ॥
वरी उठती वृत्तीचे उद्गार ॥
तयांसी जाणे तो अक्षर ॥
सिद्धचि असे ॥ ९ ॥

अंतःकरणांतल्या अतिसूक्ष्म आठवणीनें वर वृत्तीचे सूक्ष्म उद्गार उठतात, त्यांना तूंच जाणतोस, म्हणून तुला अक्षर व सिद्ध पुरुष म्हणतात. (९)

वृत्तीचें स्फुरण झालें ॥
तयामागूनि जाणणें उठिलें ॥
हें म्हणों न ये पहिलें ॥
आइतेंचि असे ॥ १० ॥

अंतःकरणांत वृत्तीचें स्फुरण झाल्यावर मग जाणणें म्हणजे ज्ञानाचा व्यापार सुरू होतो, म्हणून अंतःकरणाला पहिलें म्हणण्याचें कारण नाहीं. कारण तें आयतेंच म्हणजे स्वतःसिद्ध आहे. (१०)

अंतःकरणवृत्तीचें स्फुरण ॥
तें संकल्पविकल्पात्मक मन ॥

जें अंतःकरणवृत्तीचें स्फुरण आहे, तेंच संकल्पविकल्पात्मक झालें म्हणजे मन

तेंचि निश्चयात्मक म्हणोन ॥
बुद्धि म्हणिजे ॥ ११ ॥

होतें, आणि निश्चयात्मक झालें कीं त्याला बुद्धि म्हणतात. (११) त्या बुद्धीचा—

निश्चयात्मक जो अर्थु ॥
तेथें अनुसंधानात्मक हेतु ॥
तें चित्त हें जाण तूं ॥
तत्प्रवृत्ति तो अहंकारू ॥ १२ ॥

निश्चयात्मक प्रकार झाला म्हणजे त्यांत अनुसंधानात्मक हेतु म्हणजे कांहीं तरी वस्तूवर मन गुंतून रहाणें, असा जो प्रकार होतो, त्याला चित्त म्हणतात. आणि त्या चित्ताची जी प्रवृत्ति, तिला अहंकार म्हणतात. (१२)

ऐसी अंतःकरणपंचकस्फूर्ती ॥
तूंचि जाणसी स्वयंज्योती ॥
यालागीं स्वसंवेद्य मूर्ती ॥
आत्मा तूंचि ॥ १३ ॥

अशा प्रकारच्या ह्या अंतःकरणपंचकस्फूर्तींना तूं स्वयंज्योति असल्यामुळें जाणतोस, म्हणून स्वसंवेद्य मूर्तिरूप आत्मा तूं आहेस. (१३)

जैसा कापुसापासूनि निघे दोरा ॥
तोचि तया भास दुसरा ॥
तैसें मन बुद्धि चित्त अहंकारा ॥
होणें स्वरूपापासूनि ॥ १४ ॥

असें पहा कीं,–कापसापासून दोरा निघाला, म्हणजे कापूसपणाचा भास जाऊन त्याच्या ठिकाणीं दोरेपणाचा निराळा भास उत्पन्न होतो. त्याप्रमाणें मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार यांपैकीं प्रत्येक स्वरूपापासून होणारा भास निराळा आहे. (१४) तो कसा तें पहा—

तो पीळ नुकलितां दोरा ॥
म्हणावा परी कापूस खरा ॥
उकलितां नुकलितां दुसरा ॥
भाग नाहीं ॥ १५ ॥

दोऱ्याचा पीळ उकलला नाहीं, तोंपर्यंत त्याला दोरा म्हणावें. परंतु खरोखर तो कापूसच होय. त्याचा पीळ उकलला काय आणि न उकलला काय, त्यांत कापसावांचून दुसरें कांहींच नाहीं. (१५)

नातरी उदकाचा तरंग ॥
तेथें दुसरा नाहीं भाग ॥
तो विरालिया चांग ॥
उदक उदकीं ॥ १६ ॥

अथवा पाण्यावर तरंग आला, तरी त्या तरंगांत पाण्यावांचून दुसरा कांहीं भाग नसतो. तो तरंग विरून गेला, म्हणजे पाणीच पाण्यामध्यें मिळून जातें. (१६)

परी जळावांचोनि कांहीं ॥
आणिक विजातीय नाहीं ॥
तैसें मन माघारें आत्मयाचे ठायीं
तंव तें नाहींच होय ॥ १७ ॥

परंतु त्यांत पाण्यावांचून जसें दुसरें कांहींच नसतें, त्याचप्रमाणें मनानें माघार घेऊन आत्मस्वरूपांत बुडी दिली कीं, मनच अजिबात तरंगाप्रमाणें नाहींसें होतें, आणि आत्मरूप बनतें. (१७)

तो तरंग कां दोरा ॥
उठवी पीळ आणि वारा ॥
तैसा हा लिंगदेहाचा उभारा ॥
कारणमाया करी ॥ १८ ॥

ज्याप्रमाणें दोऱ्याला कारण पीळ, आणि तरंगाला कारण वारा, त्याचप्रमाणें कारणमायाच या लिंगदेहाची उभारणी करिते. (१८)

उकललिया कां मुरालिया ॥
पीळ वारा जाय लया ॥
तैसी आत्मज्ञानें कारणमाया ॥
मिथ्या होय ॥ १९ ॥

उकलल्यावर पीळ आणि मुरल्यावर वारा जसा नाहींसा होतो, त्याप्रमाणें आत्मज्ञान प्राप्त होण्याबरोबर कारणमायाच मिथ्या होते. म्हणजे मायाकारणच नाहींसें होतें. (१९)

तरंग जळ दोरा कापूस ॥
ऐक्य होतां जाय दुजा भास ॥
तैसें होय मन स्वरूपीं समरस ॥
तेथें अज्ञान हारपे ॥ २० ॥

तरंग आणि जळ, अथवा दोरा आणि कापूस, यांचें ऐक्य होण्याबरोबर जसा दुजा भास नाहींसा होतो, त्याचप्रमाणें मनाचें स्वरूपाशीं समरसत्व होतांच तेथें अज्ञान हरपून जातें. (२०)

असो हे स्फूर्तिकल्पना ॥
बोलिजे लिंगदेह अंतःकरणा ॥
तेथें स्वप्नावस्था जाणा ॥
वासनामय ॥ २१ ॥

अशा या स्फूर्तिकल्पनेच्या योगानें अंतःकरणाला लिंगदेह असें म्हणतात. ह्या लिंगदेहाचें स्वरूप वासनामय असून स्थिति स्वप्नावस्थेप्रमाणें आहे. (२१)

मन प्रवर्ते इंद्रियद्वारें ॥
ते वासना अभ्यंतरीं विवरे ॥
तैं स्वप्नावस्था मांडे बा रे ॥
श्रुत दृष्ट आभास ॥ २२ ॥

उघडच आहे कीं, मनाची प्रवृत्ति इंद्रियद्वारानें असल्याकारणानें तें मन वासनारूपानें जेव्हां अभ्यंतरांत म्हणजे अंतःकरणांत शिरतें, तेव्हां स्वप्नावस्थेचा खेळ सुरू होतो. त्या खेळांत ऐकिलेल्या व पाहिलेल्या सर्व गोष्टी भासरूपानें पुढें येत असतात. (२२)

तैजस अभिमानी दृश्य ॥
या इतुकिया ओळखीस ॥
असे अंतःकरणीं चिदाभास ॥
व्यापक तो ॥ २३ ॥

तेव्हां अर्थातच या कारणांवरून अंतःकरणरूपी लिंगदेहाचा तैजस अभिमानी दृश्य होतो. तथापि अंतःकरणांत चिद्रूप प्रकाश आहे, आणि तो तर सर्वव्यापक आहे. (२३)

जैसा आदित्य लोहीं पडे अग्नी ॥
तो नव्हे काय दिनमणी ॥
तैसा बिंबला जो अंतःकरणीं ॥
तो स्वयंप्रकाश ॥ २४ ॥

लोहाराच्या आंगणांतील आगीच्या भट्टींत सूर्यप्रकाश पडला एवढ्या कारणावरून जसें सूर्याचें दिनमणित्व जात नाहीं, तसा आत्मा अंतःकरणांत बिंबल्याकारणानें आत्म्याचें स्वयंप्रकाशत्व नाहींसें होत नाहीं. (२४)

यांत तुझी एक जाणीव नाहीं ॥
तरी हें इत्यादिक न स्फुरे कांहीं ॥
यालागीं चिदाभासें आभास
पाहीं ॥ भासविला ॥ २५ ॥

परंतु गंमत अशी कीं, एक जाणीवशक्ति नसेल तर हें सर्व स्फुरण कसें होतें, तें तुला कळणार नाहीं, म्हणून चित्प्रकाशाचा तुझ्या ठिकाणीं आभास आहे असा प्रकार तुला भासला. अर्थात् चित्प्रकाशाची कल्पना तुझ्या मनांत प्रज्वलित झाली नसल्याकारणानें अंतःकरणच मी आहें असें घेऊन तूं बसलास. (२५)

तुझी एक जाणीव खंडे ॥
तरी कांहीं न पुढें मांडे ॥
तेथें तुवांचि उरिजे अखंडें ॥
स्वस्वरूपें ॥ २६ ॥

यांत तुझी एक जाणीव नाहींशी होऊं दे, म्हणजे मग तुझ्यापुढें कांहीं दिसतें का पहा. त्या वेळीं तुझ्यापुढें कांहींएक न दिसतां, अखंडित स्वस्वरूपानें तुझा तूंच एक असशील. (२६)

तूंचि स्फुरशी बोलशी ऐकशी ॥
अंतरींचें अंतर जाणशी ॥
तूंचि पाहें तुजशीं ॥
विचारूनियां ॥ २७ ॥

अशा स्थितीचा विचार करून पहा, म्हणजे तुला असें वाटेल कीं, स्फुरण तुझेंच आहे, बोलणें तुझेंच आहे, ऐकणें तुझेंच आहे, अंतरांतलें अंतरंग जाणणारा तूंच आहेस, आणि तुझा तूंच पहाणारा आहेस. (२७)

जयाचेनि प्रकाशें ॥
अंतःकरण प्रकाशे ॥
जो निजतेजें स्फुरतसे ॥
तो जाण तूंचि ॥ २८ ॥

म्हणजे ज्याच्या प्रकाशानें अंतःकरण प्रकाशित होतें, व निजतेजानें जो स्फुरण पावतो, तो तूंच आहेस, समजलास का? (२८)

तेचि जाणीव धरूनि उल्हासे ॥
तरी नसतेंचि दृश्य भासे ॥
ते ते जाणीव निरसे ॥
तैं आत्मा लाभे ॥ २९ ॥

परंतु होतें आहे काय, कीं जाणतेपणाची ऐट मारली, कीं नसतेंच दृश्य पुढें येऊन उभें रहातें. आणि त्याच जाणतेपणाचा निरास होण्याबरोबर आत्मस्वरूपाचा लाभ होतो. (२९)

जाणिवेचिये वेळे ॥
जें तियेपुढें आभासलें ॥
तें दृश्य म्हणोनि त्यजिलें ॥
तेथें तेंचि उरे ॥ ३० ॥

म्हणून जाणतेपणाचा अभिमान धरल्यामुळें जें कांहीं पुढें दिसत असतें, तें दृश्य असें समजून त्याचा त्याग केला म्हणजे तेथें आत्मस्वरूपच शिल्लक राहातें. (३०)

जें जें भासे जाणिविये ॥
तें तें जरी निरसूनि जाये ॥
तरी जाणीवचि आहे ॥
तेचि पाहे तियेतें ॥ ३१ ॥

कारण, जें जें जाणिवेला भासत असतें, त्याचा त्याचा निरास करीत गेलें असतां जाणीव मात्र उरते, आणि जाणीवच जाणिवेला पाहूं लागते. (३१)

ते जाणीव आत्मयाची प्रभा ॥
तो स्वयंभू तियेतें उभा ॥
दीप आपुलिया शोभा ॥
आपण जैसा ॥ ३२ ॥

तीच जाणीव आत्म्याची प्रभा असून त्या प्रभेंतच स्वयंभू आत्मा उभा असतो. याला दृष्टांत असा आहे कीं, दीप आहे तोंपर्यंतच प्रभा आहे, म्हणून प्रभेंत दीपत्व स्वयंभू उभेंच आहे. (३२)

दृश्य मृगजळ आभासन ॥
तें करूनियां निरसन ॥
तूं पाहें बा कवण ॥
आपण ऐसें ॥ ३३ ॥

म्हणून कर काय कीं, माया-अविद्येच्या योगानें जाणिवेला जें कांहीं मृगजलवत् दृश्य भासत असतें, त्याचा निरास करून तूं स्वतः कोण आहेस हें पहा. (३३)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते लिंगदेहनिरसनं नाम पंचमप्रकरणं संपूर्णम् ॥ ५ ॥

---

*

# प्रकरण ६ वें

## कारणदेहनिरसन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

नेणें म्हणसी ते नेणिव ॥
तो मिथ्या भ्रमभाव ॥
रूपासारिखे अवयव ॥
छायेस जैसे ॥ १ ॥

नेणें म्हणून जें म्हणतोस, त्याचेंच नांव नेणिव म्हणजे अज्ञान असें आहे. परंतु अज्ञान आहे असें म्हणणें हाच आधीं खोटा भ्रम आहे. कारण रूपासारखेच अवयव जरी छायेला असतात, तरी छाया हा रूपाचा मिथ्या भासच असतो. (१)

आप आपणिया जाणता ॥
सदैव असे सर्वथा ॥
नातरी न कळण्याची अवस्था ॥
कवण सांगे ॥ २ ॥

अर्थात् सर्वकाळ आणि सर्व प्रकारांनीं आपण आपल्याला जाणतों असें होतें. मग कळत नाहीं अशी अवस्था आहे, असें सांगणारा तरी कोण ? (२)

आप आपणा जाणता निकें ॥
तेथें नेणिव आड ठाके ॥
तरी इयेचें पारखे- ॥
पण कवण सांगे ॥ ३ ॥

म्हणजे आपण आपल्याला बरोबर जाणणारे असतां मध्येंच आड जी नेणिव अर्थात अज्ञान येत असतें, त्याचें पारखेपण म्हणजे निराळेपण कोण सांगतो ? (३)

न कळे ऐसें जाणवलें ॥
तें न कळण्यासी नाहीं कळलें ॥
म्हणोनि नेणणें जया विवळे ॥
तोचि जाण आत्मा ॥ ४ ॥

या प्रश्नाला उत्तर असें कीं, "न कळे" म्हणजे समजत नाहीं असें जें जाणतां आलें म्हणजे समजलें, तें कांहीं "न कळण्यासी" म्हणजे अज्ञानाला कळलें नाहीं. म्हणून नेणणें अर्थात् अज्ञान ज्याला कळलें, तोच आत्मा आहे. (४)

आपुलिया जाणिवा ॥
धरिशी नेणिवभावा ॥
याकारणें गोंवा ॥
पडे जयाचा तयासी ॥ ५ ॥

परंतु झालें आहे काय, कीं आत्म्यानें आपला जाणिवभाव सोडून नेणिवभाव धरला आहे. म्हणून त्याचा त्यालाच गोंधळ पडून जातो ! (५)

आप आपणिया न कळे हे नेणिव
ऐसें म्हणावें तरी तोचि जाणिव-
भाव ॥ म्हणोनियां नेणिव ॥
मिथ्या भ्रांती ॥ ६ ॥

हा गोंधळ मोठा मासलेदार आहे. आपलें आपल्याला कळत नाहीं म्हणून त्याला अज्ञान म्हणावयाचें, परंतु अज्ञान आहे हें कळल्याबरोबर नेणिवभाव जाऊन त्या ठिकाणीं जाणिवभाव होतो. तेव्हां अर्थातच नेणिव म्हणजे अज्ञान हा मिथ्या किंवा खोटा भास ठरतो. (६)

नेणिव जरी जाणितली ॥
तरी ते नेणिव मिथ्या झाली ॥
तेथें जाणिव उरली ॥
आत्मप्रभा ॥ ७ ॥

म्हणजे नेणिव जाणली, कीं ती नेणिव मिथ्या ठरलीच. म्हणून नेणिव जाऊन जी जाणिव उरते, तिचेंच नांव आत्मप्रभा. (७)

तूंचि आपणा नेणसी ॥
ऐसें तूंचि जाणसी ॥
तरी नेणिवे कां गुंतसी ॥
नाथिलाचि ॥ ८ ॥

तर मग तूंच आपलें आपल्याला कळत नाहीं असें जर जाणतोस, तर विनाकारण त्या नेणिवेमध्यें तूंच आपल्याला गोंवून कां घेतोस ? (८)

तूं आत्मा स्वयंप्रकाश ॥
तेथें नेणिव हा मिथ्या भास ॥
तो निरसतां तूं अविनाश ॥
स्वतःसिद्ध ॥ ९ ॥

तूं तर स्वयंप्रकाश आत्मा आहेस. आणि झालें आहे काय, कीं तुझ्या ठिकाणीं नेणिवेचा मिथ्या भ्रम झाला आहे. परंतु त्याचा निरास होण्याबरोबर तूंच स्वतःसिद्ध अविनाशस्वरूप आहेस. (९)

या सर्वांसी जो जाणे ॥
तो काय आपणातें नेणे ॥
नेणिवेस तरी कळणें ॥
असेचिना ॥ १० ॥

असें पहा कीं, जो या सर्वांना जाणतो, तो आपण आपल्याला जाणूं शकत नाहीं काय ? नेणिव जी आहे, तिच्या ठिकाणीं जाणिव असत नाहीं. (१०)

ऐसें नेणिव तेंचि कारण ॥
कार्य स्थूळ सूक्ष्म जाण ॥

म्हणून नेणिव हेंच अज्ञानाचें कारण असून स्थूळ आणि सूक्ष्म हीं त्याचीं

तियेकारण सुषुप्तीचें लक्षण ॥
ऐक आतां ॥ ११ ॥

कार्यें आहेत. त्या अज्ञानाची अवस्था सुषुप्ति आहे, म्हणून सुषुप्तीचें लक्षण आतां सांगतों, तें ऐक. (११)

मन प्रवर्ते इंद्रियद्वारें ॥
बाह्य विषयीं वावरे ॥
ते जागृती हें खरें ॥
जाणिजेसु ॥ १२ ॥

मनाची प्रवृत्ति इंद्रियद्वारानें होत असून तें जेव्हां बाह्य विषयांमध्यें वावरत असतें, ती स्थिति म्हणजे जागृति होय, हें निश्चितपणें समज. (१२)

तो आभास घेऊनि अंतरीं ॥
मन सूक्ष्म कल्पना करी ॥
तेधवां स्वप्नावस्था बरी ॥
मांडे तेथें ॥ १३ ॥

त्या वावरण्याचा ध्यास अंतःकरणांत घेऊन सूक्ष्म कल्पना करण्यांत ज्या वेळीं मन गुंततें, त्या वेळीं त्या अवस्थेंत स्वप्नाचा बाजार मांडत असतो. (१३)

परी जाणिव दोहींची एक ॥
ते आपणिया करी निःशेख ॥
तेव्हां सुषुप्ति अवस्था देख ॥
अज्ञान गडद ॥ १४ ॥

या दोन्ही अवस्थांची जाणिवशक्ति एकच होय. ती जाणिवशक्ति ज्या वेळीं जाणपणाला निःशेष सोडून असते, त्या वेळीं त्या अवस्थेचें नांव सुषुप्ति (निद्रा) म्हणजे घोर अज्ञान असतें. (१४)

ते नेणिवचि आहे जाणिव ॥
परी धरिला विपरीत भाव ॥
आप आपणा नाठव ॥
अज्ञानवशें ॥ १५ ॥

या सुषुप्ति अवस्थेमध्यें जी नेणिव असते, तीच वास्तविक जाणिव आहे. परंतु अज्ञानवश झाल्याकारणानें विपरीत भाव धरून आपण कोण हें विसरून गेली आहे ! (१५)

आप आपणा विसरली ॥
मग प्रपंचाचा भास कल्पूं लागली ॥ मी जीव हीच भुली ॥
सुषुप्तीसी ॥ १६ ॥

आपण कोण हें विसरून गेल्याकारणानें मीच जीव अशी जाणिवेला सुषुप्तींत भूल पडून ती प्रपंचामध्यें रंगून गेली ! (१६)

ते नेणिव जैं फिटे ॥
तैं स्वयंभरूप उमटे ॥

म्हणून या नेणिवरूप सुषुप्तीचा ज्या वेळीं निरास होईल, त्याच वेळीं, किडाळ म्हणजे

जैसें किडाळ जळालियापुढें ॥
शुद्ध राहे ॥ १७ ॥

हिणकटपणा जळून गेल्यावर सोनें जसें शुद्ध होतें, त्याप्रमाणें आपलें स्वयंभूरूप प्रकट होईल. (१७)

नेणिवेपासाव उगवता ॥
अभिमान होय धरिता ॥
तो प्राज्ञ हे व्यवस्था ॥
कारणदेहाची ॥ १८ ॥

नेणिवेपासून कारणदेहाची उत्पत्ति असल्याकारणानें त्या कारणदेहाचा अभिमान धरणें याला प्राज्ञ अवस्था असें म्हणतात. अशी कारणदेहाची स्थिति आहे. (१८)

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते कारणदेहनिरसनं नाम षष्ठप्रकरणं संपूर्णम् ॥ ६ ॥**

---

## प्रकरण ७ वें

## महाकारणदेहनिरसन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

हा अवघा दृश्याकार ॥
भासे जाणिवेसमोर ॥
तो निरसूनि तूंचि उर ॥
ज्ञानस्वरूप ॥ १ ॥

जाणिवेसमोर जो सर्व दृश्याकार भासतो, त्याचा निरास कर. आणि कर काय, कीं ज्ञानस्वरूप असा तूंच शिल्लक रहा. (१) कारण–

नेणिवेच्या नेणिवभावा ॥
तूंचि जाणसी स्वयमेवा ॥
ते जाणिव धरूनि आपुलिया खेवा ॥ आपण रिघावें ॥ २ ॥

नेणिवेचा जो नेणिवभाव आहे, त्याचा जाणता स्वयमेव तूंच आहेस, म्हणून ती जाणिव धरून तूं आपल्या ठिकाणीं भेटीला जा. (२)

आप आपणासी जाणतां ॥
नेणिव आहे कीं आतां ॥
स्वयेंचि होऊनि ज्ञाता ॥
निरसे नेणिव ॥ ३ ॥

म्हणजे आपणच आपल्याला जाणल्यावर नेणिव शिल्लक राहील काय? आपणच ज्ञाता झालें म्हणजे नेणिवेचा निरास होत असतो. (३)

नेणिव जेथें निरसली ॥
तेथें जाणिव राहिली ॥
ते निजदृष्टी बोलिली ॥
आत्मरूप ॥ ४ ॥

मग नेणिवेचा जेथें निरास झाला, तेथें फक्त काय ती जाणिव एकटी राहिली. त्याच जाणिवेला निजदृष्टी म्हणतात. आणि ती निजदृष्टी म्हणजेच आत्मस्वरूप. (४)

जो आपुलिया जाणिवा ॥
जाणे प्रपंचा सर्वा ॥
तया आपणा जाणावया गोंवा ॥
पडे नेणिवेचा ॥ ५ ॥

परंतु जो आपल्या जाणिवेच्या योगानें सर्व प्रपंचाला (जगताला) जाणतो, त्यालाच आपल्या स्वतःला जाणावयाला नेणिवेचा घोंटाळा पडतो ! (५)

ते नेणिव फिटे गुरुखुणा ॥
जाणे आपण आपणा ॥
बोलिजे या अनुसंधाना ॥
महाकारण ऐसें ॥ ६ ॥

अशी जी नेणिव, तिचा गुरुखुणेनें अर्थात् गुरुप्रसादानें निरास झाल्यावर आपलें आपल्याला जाणण्याचें जें अनुसंधान लागतें, त्याला महाकारण असें म्हणतात. (६)

फिटूनियां नेणणें ॥
आप आपणा जाणणें ॥
तीन्ही देहांचेनि साक्षिपणें ॥
महाकारणदेह ॥ ७ ॥

नेणण्याचा निरास होऊन आपण आपल्याला जाणूं लागणें, आणि स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन्ही देहांत साक्षित्वानें असणें, ही महाकारणदेहाची खूण होय. (७)

तीन्ही अवस्थांचें जाणपण ॥
तियेसि तुर्या अवस्था ऐसी खूण
तीन्ही देहांचें जें अवलोकन ॥
तें महाकारण देह ॥ ८ ॥

या तीन्ही देहांच्या अवस्थांना जाणणाऱ्या स्थितीला तुर्यावस्था अशी संज्ञा आहे. म्हणून या तीन्ही देहांचें अवलोकन हेंच महाकारणदेहाचें लक्षण होय. (८)

मी सर्वसाक्षी आपण ॥
हा प्रत्यगात्म्याचा अभिमान ॥
सर्वांचें जेथें खुंटलें स्फुरण ॥
तें शुद्ध स्वरूप ॥ ९ ॥

मी स्वतः या देहलक्षणांत सर्वसाक्षी आहें हा अभिमान प्रत्यगात्म्याचा आहे. परंतु हें शुद्ध स्वरूप नव्हे. कारण शुद्ध स्वरूपांत सर्वच स्फुरण थांबावें लागतें. (९)

कार्य कारणाचें कारण ॥
यालागीं बोलिजे महाकारण ॥
कार्य-कारण झालिया शून्य ॥
महाकारण कवण म्हणे ॥ १० ॥

कार्य हें कारणाचें कारण आहे, म्हणून याला महाकारण असें म्हणतात. अर्थात् कार्य-कारणच शून्य झालें, तर मग त्याला महाकारण तरी कोण म्हणेल? (१०)

आहे स्वयंभ आपण ॥
जाणे आपली आपण खूण ॥
परब्रह्म निर्वाण ॥
निजस्वरूप ॥ ११ ॥

हा स्वयंभू आपला आपणच असल्याकारणानें, परब्रह्म निर्वाण निजस्वरूपाची आपली खूण आपणच जाणतो. (११)

ऐसें आपुलें अनुसंधान ॥
करितां होय विज्ञान ॥
प्रपंचाचें मिथ्यापण ॥
प्रत्यया ये ॥ १२ ॥

म्हणून अशा प्रकारचें आपलें अनुसंधान म्हणजे आपणच आपल्याला जाणण्याचा व्यासंग लागला, म्हणजे मग अनुभवज्ञान होऊन प्रपंचाचें मिथ्यापण प्रत्ययाला येऊं लागतें. (१२)

मी शुद्धात्मा आपण ॥
ऐसा वर्ते जो अभिमान ॥
तयाचाही साक्षी कवण ॥
तुजवांचोनि ॥ १३ ॥

त्या वेळीं मी शुद्धात्मा आहें असा जो अभिमान वर्तत असतो, त्या अभिमानाचा साक्षी तुजवांचून दुसरा कोण आहे? (१३)

म्हणोन जाणिवेचें जें निजज्ञान ॥
तें शुद्धस्वरूप आपण ॥
सर्व निरसीं परिपूर्ण ॥
निजात्मा तूं ॥ १४ ॥

म्हणून जाणिवेचें जें निजज्ञान, त्यानें सर्वांचा परिपूर्ण निरास केल्यावर तुझा तूं शुद्धस्वरूपाचा निजात्मा आहेस. (१४)

ज्ञान जेथूनि स्फुरावें ॥
तें आपणचि स्वभावें ॥
ऐसें स्वरूप अनुभवावें ॥
जाण पैं गा ॥ १५ ॥

ज्ञान हें ज्या ठिकाणांतून स्फुरण पावतें, तें ठिकाण स्वाभाविकपणें आपणच आहोंत अशा प्रकारचा स्वरूपानुभव घेणें, हें जाणून घेतलें पाहिजे. (१५)

जेथें जाणीव खुंटे ॥
तें तुझें स्वरूप नेटें बोटें ॥

आणि ज्या ठिकाणीं जाणणें थांबतें, म्हणजे याच्या पुढें काय आहे याची ज्ञानाला कल्पना होत नाहीं, तेंच तुझें खरें खरें अथवा

| | |
|---|---|
| घनानंद चढे ना वोहटे ॥<br>अपरिमित ॥ १६ ॥ | वोटानें दाखविण्यासारखें स्वरूप होय. त्या स्वरूपाच्या ठिकाणीं आनंद इतका कांहीं मावलेला आहे कीं, त्याला ओहटी तर कधीं लागतच नाहीं, परंतु भरतीलाही स्थळ नाहीं. इतका तो परमावधीचा आहे. (१६) |
| जें अमर्याद अमूप ॥<br>तें जाणिजे आपेंआप ॥<br>अविनाश स्वरूप ॥<br>अखंडित ॥ १७ ॥ | म्हणून जें अमर्याद, अमूप, अखंड आणि अविनाश असें स्वरूप आहे, तें आपोआप जाणतां आलें पाहिजे. (१७) |

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते महाकारणदेहनिरसनं नाम सप्तमप्रकरणं संपूर्णम् ॥ ७ ॥**

---

## प्रकरण ८ वें

## शून्यखंडन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

| | |
|---|---|
| जरी तें शून्य भाविजे ॥<br>तरी कल्पूनि नांव ठेविजे ॥<br>जें आपणा आपण बुझे ॥<br>तें शून्य कैसें ॥ १ ॥ | ज्या ठिकाणीं ज्ञानाची अक्कल चालत नाहीं, असें जें घनानंद अपरिमित स्वरूप, तें जरी शून्यभाव भासतें, तथापि कल्पनेनें कांहीं तरी त्याला नांव ठेविलें पाहिजे. कारण जें आपण आपल्याला जाणतें, त्याला शून्य कसें म्हणावें? (१) |
| जो सर्व शून्यातें जाणे ॥<br>तया शून्य ऐसें कवण म्हणे ॥ | आणि जो सर्व शून्याला जाणतो, त्याला शून्य म्हणणार तरी कोण? कारण जें कांहीं नाहीं, तें आपल्याला जाणणार कसें? (न जाणतें तर त्याला शून्य म्हणतां आलें असतें. परंतु जें कांहीं नाहीं असें भासतें, |

जें कांहीं नाहीं तेणें ॥
आपणा केविं जाणिजे ॥ २ ॥

तें तर आपण आपल्याला जाणतें, म्हणून त्याला शून्य म्हणवतच नाहीं ). (२)

यया स्वरूपीं नुरे दृश्य ॥
दृश्यासि द्रष्टृत्व अदृश्य ॥
जयाचे तयासीच प्रकाश ॥
स्वरूप सदा ॥ ३ ॥

त्याच्या स्वरूपापुढें दृश्य असें कांहींच उरत नाहीं, आणि द्रष्ट्यापुढें दृश्य अदृश्यच होऊन जातें. कारण ज्याचा त्याच्याच जवळ सर्वदा स्वरूपाचा प्रकाश असतो. (३)

सर्वही निरसूनि जाणिव ॥
उरली सांडून नेणिव ॥
तया ज्ञाना जाणावया भाव ॥
न स्फुरे कांहीं ॥ ४ ॥

म्हणून सर्वांचा निरास केल्यावर नेणिवेला सोडून एक जाणिव उरली, म्हणजे त्या जाणिव-रूप ज्ञानाला जाणावयाला दुसरा असा स्फुरणभाव कोणताच रहात नाहीं. (४)

म्हणोनि अभाव ऐसा भासे ॥
परी शून्य म्हणावें कैसें ॥
जें सर्वांसी जाणोनि असे ॥
शून्यासमवेत ॥ ५ ॥

या कारणानें जरी स्वरूपाच्या ठिकाणीं अभावाचा भास होतो, तरी त्याला शून्य कसें म्हणावें ? कारण तें सर्वांना जाणून शून्यासमवेत असतें. (५)

शून्यातें शून्यपण ॥
जाणिव कल्पी आपण ॥
ते स्वरूपीं होय लीन ॥
शून्यासहित ॥ ६ ॥

ती जाणिव शून्याचें शून्यपण आपल्याच ठिकाणीं कल्पून स्वरूपाच्या ठायीं शून्यासहित लीन होऊन जाते. (६)

तें शून्य ना जाणिव ॥
दृश्य ना नेणिव ॥
ज्ञप्तिमात्र भरींव ॥
स्वस्वरूप ॥ ७ ॥

या स्वरूपाची ओळख म्हणजे, तें शून्य नाहीं आणि जाणिवही नाहीं. तसेंच दृश्य नाहीं व नेणिवही नाहीं. परंतु ज्ञप्तिमात्र स्वस्वरूपानें सर्वत्र भरलेलें आहे. (७)

जें निरंतर निर्मळ ॥
ज्ञानघन केवळ ॥
चिदाकाश अखिल ॥
अगोचर ॥ ८ ॥

म्हणजे असें कीं, जें निरंतर निर्मळ असून केवळ ज्ञानानें भरलेलें आणि दृष्टीला न दिसणारें आहे, तेंच सर्वव्यापी चिदाकाश आहे. (८)

जेथें शून्य दृश्याकार ॥
अज्ञान निरसूनि अनिवार ॥
जें सूक्ष्माहूनि सूक्ष्म सपुर ॥
निजज्ञान ॥ ९ ॥

तसेंच जें अनिवार अज्ञानाचा नाश करीत असल्यानें शून्य आहे तरी (शक्तिरूपानें) दृश्याकार आहे, आणि जें निजज्ञानरूप सूक्ष्माहूनही अत्यंत सूक्ष्म असें आहे. (९)

जें निष्कलंक ज्ञानाकाश ॥
करी शून्याकाशाचा ग्रास ॥
तो निजद्रष्टा स्वयंप्रकाश ॥
परमात्मा तूं ॥ १० ॥

तसेंच जें निष्कलंक ज्ञानाकाश असून शून्याकाशाचा ग्रास करणारें आहे, तोच तूं स्वतःच स्वतःला पाहणारा स्वयंप्रकाशस्वरूप परमात्मा आहेस. (१०)

तो तूं निरालंब साक्षी ॥
निर्लेपक सर्वपक्षीं ॥
पारावाररहित निरीक्षीं ॥
देखणा तूं होऊनी ॥ ११ ॥

असा जो तूं, तो तूं स्वतंत्र असून साक्षीरूप आहेस, सर्वपक्षीं दोषरहित आहेस, आणि सीमारहित आहेस, हें तूं प्रेक्षक होऊन नीट निरीक्षण करून पहा. (११)

जें ज्ञानाचें जिव्हार ॥
आस्तिक्याचें घर ॥
सुखाचें सागर ॥
घनानंद तूं ॥ १२ ॥

आणि तूं ज्ञानाचें जिव्हार असून आस्तिक्यबुद्धीचें घर आहेस, आणि आनंदघन असल्याकारणानें तूं केवळ सुखसागरच आहेस. (१२)

जें सर्व साक्षीचें दीपन ॥
जें प्रकाशाचें कोंदण ॥
जें आत्मानंदाचें निधान ॥
तें कैवल्य तूं ॥ १३ ॥

आणि सर्वसाक्षीचें दीपन (प्रकाशक), प्रकाशाचें कोंदण (प्रकाशाला शोभविणारें), आणि आत्मानंदाचें निधान जें कैवल्य, तें तूंच आहेस. (१३)

जें सकळ निरासें शुद्धबुद्ध ॥
जेथें नुरे त्वंपद ॥

आणि सर्वांचा निरास करून अखेर जें शुद्ध ज्ञान रहातें, तसेंच ज्या ज्ञानांत त्वंपद

सरे तत्पद शुद्ध ॥
असिपदेंसीं ॥ १४ ॥

म्हणजे मीपण जाऊन शुद्ध तत्पदही असिपदासह लय पावतें, (१४)-

ऐसा तूं परमात्मा ॥
परि तुझा त्वां हारविला महिमा
आतां मिळूनि राहिजे निजधामा
कैसिया परी ॥ १५ ॥

असा तूं परमात्मा आहेस. पण तूं स्वतःच जर आपला महिमा हारविलास, तर स्वतःच्या मूळ ठिकाणीं तुला ऐक्यरूपानें कसें राहतां येईल ? (१५)

तो लक्ष्यांश अनुवादणें ॥
परिसावा शुद्ध अंतःकरणें ॥
नित्य जैसें अभ्यासणें ॥
तैसें सांगूं ॥ १६ ॥

म्हणून नित्य अभ्यासाच्या योगानें प्राप्त होणारा शुद्ध लक्ष्यांश कसा साधावा, तो प्रकार आतां सांगतों. तो तूं शुद्ध अंतःकरणानें ऐक. (१६)

जेणें स्वरूपीं निश्चय बैसे ॥
शुद्ध परमात्मा प्रकाशे ॥
सदा चित्त रमोनि समरसे ॥
कैवल्यामाजी ॥ १७ ॥

त्या अभ्यासाची पद्धत अशी कीं, जिच्या योगानें स्वस्वरूपावर निश्चय बसून शुद्ध परमात्मरूप प्रकाशेल, आणि मोक्षसुखाच्या ठायीं चित्त रममाण होऊन समरस होईल. (१७)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते शून्यखंडनं नाम अष्टमप्रकरणं संपूर्णम् ॥ ८ ॥



# प्रकरण ९ वें

## अभ्यासयोग

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

तरी हें सांगितल्यापरी ॥
तें स्वरूप निर्धारीं ॥
मग ऐसाच अभ्यास करीं ॥
नित्यनेमेंसीं ॥ १ ॥

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा निर्धार करून मग नित्यनेमानें असाच अभ्यास कर. (१)

पाहिजे एकांत स्थान ॥
जेथें चंचळ न होय मन ॥
सकळ वृत्तींतें आवरून ॥
बैसावें तेथें ॥ २ ॥

नित्याभ्यासाला बसावयास अशा प्रकारचें एकांत स्थळ पहा कीं, ज्या ठिकाणीं मनाला केव्हांही चंचलता उत्पन्न होणार नाहीं. तेथें सर्व मनोवृत्ति आवरून बसावें. (२)

करूनि विषयाची निवृत्ती ॥
चित्तासी प्रत्यगावृत्ती ॥
धरीं दृश्यमात्रीं विरक्ती ॥
त्यागबुद्धी ॥ ३ ॥

कारण, मन हें चंचल आहे. म्हणून काय करावें, कीं विषयाचीच प्रथमतः निवृत्ति करून चित्ताची अंतर्मुख प्रवृत्ति करावी. ही चित्ताची अंतर्मुख प्रवृत्ति करण्याकरितां दृश्यमात्र म्हणून जेवढ्या वस्तु आहेत, तेवढ्यांविषयीं त्यागबुद्धीनें विरक्ति धरावी. (३)

बैसोनि आसनीं सावकाशें ॥
अंतरामाजी प्रवेशें ॥
एकवटीं इंद्रियद्वारीं बैसे ॥
मनोवृत्ति जे ॥ ४ ॥

मग सावकाशपणें आसनावर बसून अंतःकरणांत प्रवेश करावा, आणि जी मनोवृत्ति निरनिराळ्या वासनायुक्त इंद्रियद्वारांवर बसलेली असेल, ती तेथून काढून एकाग्र करावी. (४)

सांडूनि अभिमान स्थूळाचा ॥
भाव धरीं अंतराचा ॥
अभाव करूनि सर्वांचा ॥
गगन पाहीं ॥ ५ ॥

तसेंच स्थूलदेहाभिमान सोडून अंतरात्म्याचा भाव धरावा, आणि सर्वांचा शून्यांत लय करून आकाश मात्र शिल्लक उरलें आहे, अशी खात्री करून घ्यावी. (५)

स्थूळ इंद्रियांमधून ॥
युक्तीनें एकवटीं मन ॥
अंतराकाशीं नेऊन ॥
स्थिर करीं ॥ ६ ॥

पण स्थूळ इंद्रियांमधूनच युक्तीनें मन एकवट करावें, आणि अंतराकाशांत, अर्थात् अंतःकरणांत नेऊन स्थिर करावें. (६)

जे जे वृत्ती बाहेर धांवे ॥
तियेतें परतोनि आणावें ॥
येणें अभ्यासें मन स्थिरावे ॥
आपेंआप ॥ ७ ॥

असें करतांना जी जी मनोवृत्ति बाहेर धांव घेईल, तिला तिला परतून आणीत असावें. अशा प्रकारें नित्याभ्यास चालू ठेवला असतां मनोवृत्ति आपोआपच स्थिरावतील. (७)

नातरी जिकडे मनाची राहाटी ॥
न लागावें तयाचे पाठीं ॥
माघारी घालोनियां दृष्टी ॥
स्वस्वरूपीं ठेविजे ॥ ८ ॥

मात्र अशी एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, जिकडे म्हणून मनाची प्रवृत्ति झाली, त्या प्रवृत्तीच्या पाठीं लागूं नये. तर त्या मनः-प्रवृत्तीला माघारी आणून स्वस्वरूपाजवळ ठेवावी. (८)

मन जो जो विषय धरी ॥
तो तो विवेकें विदारीं ॥
तरी तें स्थिरावे अंतरीं ॥
सांडूनि कल्पना ॥ ९ ॥

असें करणें युक्तीचें काम आहे. म्हणून काय करावें, कीं मनांत जो जो म्हणून विषय येईल, तो तो विषय विचारानें मनांतून काढून टाकीत गेलें असतां तें मन कल्पनेचा नाश करून अंतःकरणांत स्थिर होऊन बसेल. (९)

तेथें हृदयाकाशीं ॥
मीपण स्फुरे जीवासी ॥
तेंचि विवेकेंसीं ॥
पाहिजे जंव ॥ १० ॥

मग अशा प्रकारें मन अंतरांत जाऊन स्थिर झालें, म्हणजे अंतःकरणाकाशांत जीवाला मीपणाचें स्फुरण होऊं लागतें. त्या स्फुरणाविषयीं विचार करून पाहूं लागलें असतां (१०)–

तंव तें निरालंबीं स्फुरे ॥
पुनरपि तेथेंचि मुरे ॥
तरी जीवदशा बा रे ॥
नास्तिक्य पावे ॥ ११ ॥

तें स्फुरण निरालंब अशा चैतन्यस्वरूपांत स्फुरतें. तें तेथेंच जर पुन्हां मुरून गेलें, तर जीवत्वदशेचा नाश होतो. (११)

नदी उगमीं स्थिरावे ॥
तरी सिंधूपण कां न पावे ॥
तैसें जीवाचें ब्रह्म कां न व्हावें ॥
या स्थितीं राहतां ॥ १२ ॥

उघडच आहे, कीं जर नदी उगमांतच स्थैर्य पावेल, तर समुद्राच्या योग्यतेस कां येणार नाहीं ? त्याचप्रमाणें जीव आपल्या उगमस्थानीं (शिवस्वरूपीं) स्थिर झाला तर जीवाचें ब्रह्म कां होऊं नये ? (१२)

म्हणूनि परतावें अभ्यंतरीं ॥
अभ्यास करावा ऐशियापरी ॥
मग कल्पना अभ्यंतरीं ॥
समरसोनि जाय ॥ १३ ॥

म्हणून करावें काय, कीं बाह्य वृत्ति सोडून परतून अंतःकरणांत शिरावें, आणि अशा प्रकारानें अभ्यास चालू ठेविला असतां कल्पना अंतःकरणांत समरस होऊन जाते. (१३)

सोडून स्थूळ गती ॥
ऐशी राहे अंतरस्थिती ॥
तोंवरी अभ्यास निगुतीं ॥
करावाचि लागे ॥ १४ ॥

हा अभ्यास करण्याची मर्यादा इतकी आहे कीं, स्थूलगति सोडून म्हणजे मनोवृत्ति बंद होऊन अंतःकरणांत समरसता होईतों-पर्यंत हा अभ्यास निश्चयानें केलाच पाहिजे. (१४)

तेथें जें जें दृश्य स्फुरे ॥
तें तें सोडून होयीं माघारें ॥
ज्ञानस्वरूप निर्धारें ॥
आपण होइजे ॥ १५ ॥

असा अभ्यास करीत असतांना जें जें कांहीं दृश्य स्फुरण होईल, तें तें सोडून अथवा त्याचा त्याग करून मन माघारें वळवावें व आपणच निर्धारानें ज्ञानस्वरूप बनून जावें. (१५)

देखणेंचि देखण्यावरी ॥
परतोन राहे जरी ॥
तरी दृश्याकारा उरी ॥
कैसेनि होय ॥ १६ ॥

द्रष्ट्याची दृष्टीच (पहाणेंच) जर परत फिरून द्रष्ट्याचे मूळ स्थानीं (स्वस्वरूपीं) स्थिर झाली, तर दृश्य आकार दिसण्यास जागा तरी कुठें राहील ? (१६)

साकारादि आघवें ॥
शून्य होय स्वभावें ॥

अर्थात् सर्व साकार दृश्य आपोआपच शून्य होऊन जातें. यासाठीं आपण काय

| | |
|---|---|
| तेथें आपण पाहावें ॥<br>आत्मस्वरूप ॥ १७ ॥ | करावें, कीं साकारांतच आपण आत्मस्वरूप पहावें, म्हणजेच अभ्यासाच्या योगानें सर्वत्र आत्मस्वरूपच पहावें. (१७) |
| जैसें वाढलिया प्रलयनीर ॥<br>नुरे कांहीं आकार ॥<br>अंतःकरणादि व्यवहार ॥<br>तैसा होय ॥ १८ ॥ | प्रलयकालीं सर्व सृष्टि जलमय झाली म्हणजे जसा कांहींच आकार रहात नाहीं, त्याप्रमाणें अंतःकरणाचे व्यवहार होतात. म्हणजे आत्मस्वरूपावांचून दुसरें कांहींच दिसेनासें होतें. (१८) |
| जैसें कूर्में आकुंचन केलें ॥<br>कर चरण शिर अंतरीं नेलें ॥<br>मग आपणिया आपण उरलें ॥<br>अखंडित ॥ १९ ॥ | म्हणून कांसव जसा आपले हात, पाय व शिर आकुंचन करून घेतो, त्याप्रमाणें अखंडित आपले आपणच उरण्याकरितां जाणिवेच्या बळानें मन आणि इंद्रियें समरस करून आपण अंतराकाशांत नेऊन सोडलीं पाहिजेत. (१९) |
| जाणिव याचिपरी ॥<br>प्रवेशतां अंतरीं ॥<br>तेथें एकलीच उरे उरी ॥<br>आपणियाची ॥ २० ॥ | अशा प्रकारें जाणिवेचा प्रवेश अंतराकाशांत झाला, म्हणजे त्या ठिकाणीं आत्मस्वरूप तेवढेंच शिल्लक उरतें. (२०) |
| आपण एकीं एकला ॥<br>दुजा नाहीं देखिला ॥<br>ज्ञानमात्र संचला ॥<br>आत्माराम ॥ २१ ॥ | मग मात्र आपला आपण एकटाच दिसत असून दुसरा कोणीच त्या ठिकाणीं दिसत नाहीं. म्हणजे ज्ञानमात्र आत्माराम सर्वत्र भरला आहे असें दिसतें. (२१) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अभ्यासयोगो नाम नवमप्रकरणं संपूर्णम् ॥ ९ ॥

# प्रकरण १० वें

## दृश्यभासखंडन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

ऐसा उमज न होतां ॥
अज्ञानगडदामाजी पडतां ॥
न कळे म्हणोनि भ्रमतां ॥
वेड लागे ॥ १ ॥

मी मी म्हणून जें कांहीं अहंकारानें आपण म्हणत असतों, तें अहंकारी स्वरूप वास्तविकपणें मी नाहीं, या गोष्टीचा उमज पडत नाहीं आणि भरगच्च अज्ञानांत गुंतून गेलों; अशा स्थितींत ब्रह्म कळत नाहीं म्हणून जिकडेतिकडे फिरूं लागलों तर भ्रमिष्ट वेड्यासारखी स्थिति होते. (१)

तो भ्रम आपणचि वाहे ॥
नाथिलें अज्ञान धरूनि राहे ॥
वायां संदेहीं पाहे ॥
न कळे म्हणोनि ॥ २ ॥

उघडच आहे कीं, कळत नाहीं म्हणून आपणच व्यर्थ संदेहांत पडावयाचें, आणि त्या संदेहांत नसत्या अज्ञानाला धरून आपणच भ्रम वाहावयाचा ! (२)

उजेडींचा घरांत आला ॥
तंव दृष्टीं अंधार भरला ॥
डोळे असतां अदेखणा झाला ॥
आपणासी तो ॥ ३ ॥

म्हणजे असा प्रकार व्हावयाचाच कीं, उजेडांतून घरांत आलें असतां आपल्या दृष्टींत जसा अंधार भरतो, अर्थात् कांहीं वेळ दिसेनासें होतें; म्हणजे डोळे असून तो आपला आपणच आंधळा होतो ! (३)

कां निशीचिया दोन प्रहरीं ॥
डोळियां गडद पडे भारी ॥
तैसा अज्ञान-आंधारीं ॥
गुंतों नको ॥ ४ ॥

अथवा रात्रीच्या दोन प्रहरीं डोळ्यांभोंवतीं जसा गर्द अंधार असतो, त्याप्रमाणें या दृश्यवस्तुरूप असलेल्या अज्ञानांधकारांत तूं गुंतूं नकोस. (४)

तेथें मनासि जें जें कल्पणें ॥
तें तें सन्मुख देखणें ॥

कारण या अज्ञानांधकारांत तूं एकदां गुंतून गेलास, तर होईल काय, कीं मनांत जी जी म्हणून कल्पना करशील, ती

दृश्य निरसोनि राहणें ॥
स्वस्वरूपीं निश्चलत्वें ॥ ५ ॥

ती मूर्तिमंत तुझ्यापुढें येऊन उभी राहील. म्हणून कर काय, कीं दृश्य वस्तूंचा निरास करून स्वस्वरूपीं निश्चलत्वानें रहा. (५)

बोलें आपण आपणासीं ॥
अंतरीं आपणा आपण उपदेशीं ॥
पाहें तया विवेकासीं ॥
कांहीं आकार असेना ॥ ६ ॥

आणि बोलावयाचें तें आपल्याचजवळ बोल, उपदेश करावयाचा तरी अंतःकरणांत आपला आपल्यालाच कर, आणि मग विचार करून पहा, म्हणजे ज्याच्याजवळ बोलावयाचें आणि ज्याला उपदेश करावयाचा, त्या ठिकाणीं कांहीं आकार दिसत नाहीं असें समजून येईल. (६)

जेथूनि उपजे विवेकमातू ॥
पाहें तया अंतःकरणांतू ॥
तेंही धरूनि जाणिवहेतू ॥
जाणतें होय ॥ ७ ॥

परंतु, ज्या ठिकाणांतून विवेकाची गोष्ट निघते तें ठिकाण पाहूं गेलें, तर अंतःकरण दिसतें, आणि तेंच अंतःकरण जाणिवहेतू धरून ज्ञानी बनतें. (७)

देहासहित ब्रह्मांड शून्य ॥
झालिया उरे परिपूर्ण ॥
कांहीं न दिसे स्थानमान ॥
कवणे ठायीं ॥ ८ ॥

त्या जाणिवेनें म्हणजे ज्ञानानें पाहूं गेलें असतां देहासहित सर्व ब्रह्मांड शून्य झाल्यावर स्थानमान कोठेंच कांहीं न दिसतां सर्वत्र परिपूर्ण भरून उरलेलें स्वस्वरूप दिसतें. (८)

साकार हा त्रिलोकु ॥
नेणों काय झाला सकळिकु ॥
संचलों मी एकाएकु ॥
चिदाकाश ॥ ९ ॥

मग साकार त्रैलोक्य कसलें आणि काय? कोठच्या कोठें सर्व नाहींसें होऊन मीच मी एकीएक प्रकाशरूप संचलों आहें असें विवेकदृष्टीनें दिसतें. (९)

अंतर्बाह्य परिपूर्ण ॥
शून्य झालें दृश्याचें भान ॥

आणि होतें काय, कीं अंतर्बाह्य दृश्य भास पूर्णपणें शून्यवत्–नाहींसा होऊन

असणें आपणिया आपण ॥
एकत्वरहित ॥ १० ॥

एकपणही मोडलें जातें, आणि आपला आपणच शिल्लक राहतो. (१०)

तेथें आंधारी गेली ॥
मनबुद्धी मावळली ॥
आत्मप्रभा उजळली ॥
चिदादित्याची ॥ ११ ॥

त्या वेळीं आंधारी म्हणजे अज्ञान नाहींसें होतें, मनबुद्धीचा खेळ मावळून जातो आणि चित्सूर्याची आत्मप्रभा उजळते. (११)

येणेंपरी स्थूळाचा ॥
प्रवृत्त मोडला जागृतीचा ॥
आतां निरास लिंगदेहाचा ॥
तैसाच कीजे ॥ १२ ॥

अशा प्रकारें स्थूळदेहाच्या जागृतावस्थेची प्रवृत्ति मोडल्यावर लिंगदेहाच्या अवस्थेचाही तशाच प्रकारानें निरास करतां येतो. (१२)

स्फूर्ति स्फुरे जेथुनी ॥
तें पहिलेंचि असे अस्फूर्तिपणीं ॥
तुज देखतां उमटोनी ॥
मावळे स्फूर्ति ॥ १३ ॥

तो असा कीं, ज्या ठिकाणांतून स्फूर्ति उत्पन्न झाली असें वाटतें, तें स्थान अस्फूर्तिपणानें मूळचेंच असतें. ती स्फूर्ति तुझ्यासमोरच उत्पन्न होते व जागच्या जागीं मावळून जाते. (१३)

तूं तये स्फूर्तीचा जाण ॥
संकल्पविकल्पाचें जीवन ॥
निश्चयाचें कारण ॥
तूंचि असे ॥ १४ ॥

म्हणून या स्फूर्तींचा जाणता तूं आहेस, संकल्पविकल्पाचें जीवनही तूंच आहेस, आणि निश्चयाचें कारण पण तूंच आहेस. (१४)

अनुसंधान पूर्वींच असे ॥
म्हणूनि तें उपजतां तुज दिसे ॥
अहंता तुझेनि आंगें वसे ॥
तेही तूंचि जाण ॥ १५ ॥

आणि अनुसंधान म्हणजे ध्यास लागणें हा पूर्वींचाच प्रकार आहे, म्हणून अनुसंधान सुरू झालेलें तुला दिसतें. अहंकार तुझ्याच बळानें अंगीं जडतो, म्हणून तोही तुझेंच स्वरूप आहे. (१५)

ऐसें पांचां भेदीं अंतःकरण ॥
हेंही तूंचि स्फुरे जाण ॥

अशा पांच प्रकारच्या अंतःकरणस्फूर्ती तूंच असल्याकारणानें त्या स्फूर्ती सोडल्या, तर

तें सांडितां काय तुजविण ॥
वेगळें पडे ॥ १६ ॥

त्या तुझ्यावांचून वेगळ्या थोड्याच होणार आहेत ? कारण त्या सोडून सुटण्यासारख्या नाहींत. सोडणें हा भाव फक्त भावनेचा आहे. (१६)

जळें तरंग केवीं सांडावा ॥
आकाशें वायु केवीं दवडावा ॥
तेवीं तुझिया स्फूर्तिभावा ॥
कैसेनि दवडिजे ॥ १७ ॥

कारण असें पहा, कीं तरंगाला सोडून देईन असें पाणी म्हणेल, तर पाण्याला तें कसें करतां येईल ? अथवा वायूला हांकून लावूं असें आकाश म्हणेल, तर तें आकाशाला कसें करतां येईल ? अर्थातच तरंग आणि वारा हीं अनुक्रमें पाणी आणि आकाश यांच्यांतच उत्पन्न होणारीं आहेत. त्याचप्रमाणें अंतःकरणस्फूर्तिपंचक तुझ्यांतच म्हणजे स्वरूपांतच होत असल्यानें त्याला दूर दवडून देतां कसें येईल ? (१७)

तरंग जळीं विरे ॥
वायु गगनीं मुरे ॥
तैशी तुझी स्फूर्ति स्फुरे ॥
तुजमाजी ॥ १८ ॥

तरंग ज्याप्रमाणें जळांत विरतो, अथवा वायु गगनांत मुरतो, त्याप्रमाणें तुझी स्फूर्ति तुझ्यामध्येंच स्फुरण होते, आणि तुझ्यामध्येंच लीन होऊन जाते. (१८)

झाडितां आपला हात ॥
तंव आंगासि असे जडित ॥
तैशी अंतःकरणस्फूर्ति मूर्तिमंत ॥
कैशी सांडिशी ॥ १९ ॥

आणखी असें पहा कीं, आपला हात झाडला, तर तो निराळा न होतां अंगाला जसा जडलेलाच राहतो, त्याप्रमाणें अंतःकरणस्फूर्ति तुझीच असल्यानें ती सांडून अर्थात् टाकून कशी देतां येईल? (१९)

सांडूं पाहशी तंव तेचि स्फूर्ति ॥
करूं पाहशी तंव तेचि वृत्ति ॥

अंतःकरणपंचकस्फूर्ति कां सोडतां येत नाहीं ? त्याचें कारण असें आहे कीं, ती जरी सोडावयाचा विचार ठरविला, तरी तो विचार स्फूर्तीमुळेंच उत्पन्न झालेला असतो.

विचारूं पाहसी तंव तेचि मति ॥
मनचि तें ॥ २० ॥

कांहीं करावयाला लागशील तरी तो त्या वृत्तीचाच परिणाम होय. विचार करावयाला लागलास तरी तेंच स्वरूप मति म्हणजे बुद्धि आहे, आणि मन देखील तेंच आहे. (२०)

चिंतूं पाहसी तंव तें चित्त ॥
मी म्हणतां अहंकार होत ॥
उगाचि असतां स्वस्थ ॥
स्वस्थता स्फुरे ॥ २१ ॥

तूं चिंतन करावयाला लागलास तर तेंच चित्त होतें, मीपणा घेण्याबरोबर तेंच स्वरूप अहंकार बनतें, आणि उगीच स्वस्थ राहिलें, तर स्वस्थता हेंही त्याच स्फूर्तीचें रूप होय. (२१)

जरी उगाचि असता ॥
तरी कां आठवूं स्फुरता ॥
संकल्पविकल्प करिता ॥
कासयासी ॥ २२ ॥

जीव जर निश्चल असता तर आठवणीचें स्फुरण कसें झालें असतें? आणि संकल्पविकल्पही कसे झाले असते? (२२)

एक निश्चय धरिता ॥
तरी कां पुनःपुन्हां चिंतिता ॥
देहत्वें कां आंगवता ॥
मी म्हणोनि ॥ २३ ॥

त्यानें एक निश्चय धरिला असता, तर मग त्यानें वारंवार चिंतन कां केलें असतें? आणि देहाच्या योगानें "मी मी" असें तरी कां म्हणत बसला असता? (२३)

म्हणोनि हें असतचि सरे ॥
ऐसें वर्म आहे बा रे ॥
तें ज्ञान नसतें तरी अहंकारें ॥
केवीं उठिजे ॥ २४ ॥

म्हणून यांत वर्म म्हणून खरी खरी किल्ली इतकीच आहे कीं, या सर्व स्फूर्तिभावना असतांना त्या नाहींशा करून टाकावयाच्या आहेत. परंतु त्या सर्व नाहींशा करावयाच्या म्हणजे अहंकाराला नाहींसें करावयाचें आहे. परंतु तें ज्ञान जर नसतें, तर अहंकार तरी कुठें उत्पन्न झाला असता? (२४)

आठव चित्तीं जो राहे ॥
तें ज्ञान नव्हे तरी काये ॥
ज्ञानेंविण स्थिरत्व आहे ॥
बुद्धीस कोठें ॥ २५ ॥

चित्तांत जो आठव आहे, त्याचेंच नांव ज्ञान नव्हे काय? आणि ज्ञानावांचून बुद्धीला स्थिरत्व तरी कसें येणार? (२५)

तें ज्ञान जरी अधिष्ठान ॥
तरी संकल्पविकल्पात्मक मन ॥
तेंचि ज्ञान परिपूर्ण ॥
यालागीं स्फुरण असेना ॥२६॥

मन हें त्या ज्ञानाचें अधिष्ठान असल्यामुळें संकल्पविकल्प करितें. तें परिपूर्ण ज्ञान आहे, म्हणून त्याला स्फुरण नाहीं. (२६)

तें स्मरतां न ये स्मरण ॥
स्मरण जयाचें विस्मरण ॥
तें ज्ञान ना अज्ञान ॥
ज्ञप्तिमात्र जें ॥ २७ ॥

तेव्हां अर्थातच स्मरण करूं लागलें असतां तें स्मरतां येत नाहीं, आणि स्मरण होत नाहीं, म्हणून स्मरण हेंच विस्मरण होय. याकरितां त्याला ज्ञान म्हणतां येत नाहीं, व अज्ञानही म्हणतां येत नाहीं. परंतु कांहीं म्हणावयाचेंच झालें, तर ज्ञप्तिमात्र अथवा ज्ञानकला म्हणतां येईल. (२७)

कांहीं वृत्तिभास भासे ॥
तो स्फुरतांचि तया दिसे ॥
परी स्वतां आपण असे ॥
निराभास ॥ २८ ॥

कारण वृत्तिस्फुरणाच्या योगानें कांहीं भास भासतो, परंतु आपण स्वतः ज्ञप्तिमात्र निराभास आहे. (२८)

तो निराभास म्हणावा कवण ॥
तेंचि तया असे जाण ॥
जाणिवही जिरवून ॥
आंगींचे आंगीं ॥ २९ ॥

हें जें कांहीं निराभास आहे हें तरी कोण ? तर जाणीवही अंगीं मुरवून राहिलेलें एकटें एक आत्मरूप आहे. (२९)

यालागीं जाणिव नेणिव ॥
भाव ना अभाव ॥
तेंचि तें स्वयमेव ॥
स्वस्वरूप ॥ ३० ॥

निराभासाच्या ठिकाणीं जाणिव-नेणिव अथवा भाव-अभाव ह्या वृत्ति नसून तें स्वयमेव स्वस्वरूप आहे. (३०)

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते दृश्यभासखंडनं नाम दशमप्रकरणं संपूर्णम् ॥ १० ॥**

---

# प्रकरण ११ वें

## अज्ञानखंडन

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

आपण आपणासि नेणें ॥
ऐसें आपणचि जाणें ॥
जाणपण हें नुमजणें ॥
तेंचि पैं तें ॥ १ ॥

आपणच आपल्याला ओळखीत नाहीं असें आपण जाणत असतों. ह्या जाणते-पणाला नुमजणें हेंच तें अज्ञान होय. (१)

नेणिवेच्या ग्रासें ॥
जाणिव उरली दिसे ॥
तेचि तेथें वसे ऐसें ॥
केवि घडे ॥ २ ॥

कारण, नेणिवेचा नाश करून जर जाणिव (ज्ञान) शिल्लक राहिली आहे, तर मग नेणिव तेथें कशी असूं शकेल ? (२) अर्थात् ही गोष्ट शक्यच नाहीं.

जाणिवा नेणिवा ॥
दोहीं विरहित भावा ॥
दोहीं बीजां वोलावा ॥
विस्तारिता तो ॥ ३ ॥

तो परमात्मा जाणिव आणि नेणिव या दोन्ही भावांविरहित असून जाणिव आणि नेणिव अशा दोन प्रकारच्या बीजांना ओलावा देऊन त्यांचा विस्तार करणारा आहे. (३)

तो जाणिवा नेणिवा ॥
नातुळे दोन्ही भावां ॥
आधींच असे तो जाणावा ॥
स्वरूपानंद ॥ ४ ॥

तो परमात्मा असा आहे कीं, तो जाणिव आणि नेणिव या दोन्ही भावांनीं दोषयुक्त होत नसून मूळचाच तो स्वरूपानंद आहे. (४) आणि म्हणून—

कांहींच न स्फुरतां आदी ॥
जें स्थळ असे अनादी ॥
जे ज्ञानाची कदी ॥
ज्ञप्तिमात्र ॥ ५ ॥

कोणत्याही प्रकारचें स्फुरण होण्यापूर्वींचें तें अनादि स्थळ आहे. त्या योगानें तो केवळ ज्ञानाची 'कदी' म्हणजे कोंदणच ज्ञप्तिमात्र-रूपानें आहे. (५)

जें निष्कलंक ज्ञानघनानंद ॥
आपणचि आपण स्वतःसिद्ध ॥
निजरूप विशुद्ध ॥
स्वसंवेद्य ॥ ६ ॥

जें निष्कलंक, ज्ञानघनानंद, आपलें आपणच स्वतःसिद्ध, आणि अत्यंत शुद्ध-रूपानें स्वसंवेद्य म्हणजे स्वतःला जाणणारें असें आत्मस्वरूप आहे; (६) आणि

जें जाणेचि जाणणें ॥
म्हणून नाहीं तेथें नेणणें ॥
तें आपआपण एकपणें ॥
जाणे ना नेणे ॥ ७ ॥

"जें जाणेचि जाणणें" म्हणजे जें जाणि-वेला जाणतें, त्याच्या ठिकाणीं नेणणेंपण रहात नाहीं. कारण एकटेपणामुळें तें आप-ल्याला जाणतही नाहीं, आणि नेणतही नाहीं. (७)

तें परिपूर्ण एकलें ॥
म्हणोनि दिसावें हें खुंटलें ॥
घनानंद कोंदाटलें ॥
स्वस्वरूप ॥ ८ ॥

असें परमात्मस्वरूप एकच परिपूर्ण भरलें असल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं दुजा दृश्य-भाव नाहींसा होतो. कारण स्वस्वरूपच घनानंदरूप सर्वत्र कोंदाटून गेलें आहे. (८)

दिसतें तें दुसरें ॥
तेंही जेथें सरे ॥
मग देखणेंचि उरे ॥
तेंचि तया केविं दिसे ॥९॥

आतां जें दिसतें, तें त्या दिसणाऱ्या स्वरूपाहून भिन्न आहे. तो भिन्नपणा नाहींसा झाला, म्हणजे एकच आत्म-स्वरूप उरतें. तें स्वतःच स्वतःला कसें दिसेल ? (९)

तें देखणेंचि देखणें ॥
म्हणोनि तयासि तें पाहणें ॥
जें जाणवलें तें निरसणें ॥
उरे तेंचि ॥ १० ॥

या पाहाण्यांत मुख्य मुद्याची गोष्ट ही लक्षांत ठेवली पाहिजे कीं, दुसरेपण नाहींसें करून पाहावयाचें आहे. म्हणजे ज्याचें त्यानेंच आपलें आपल्याला पाहावयाचें आहे. आतां पहाणाराच आपल्याला पाहूं लागतो, म्हणून त्याच्या पाहाण्याला 'पाहणें' म्हणाव-याचें. पाहून जें समजतें, त्याचा निरास झाला, म्हणजे पाहाणारा तेवढाच शिल्लक उरतो. (१०)

दृश्य द्रष्टा दर्शन ॥
या तीन्ही भावांविलक्षण ॥
एकलेंचि आपण ॥
ज्ञप्तिमात्र ॥ ११ ॥

दृश्य, द्रष्टा आणि दर्शन या तीन्ही भावां-विलक्षण असून तें केवळ एकटेंच ज्ञप्तिमात्र-रूपानें आहे. (११)

दृश्य दर्शन हारपे ॥
तेथें उरिजे स्वस्वरूपें ॥
अखंडित आपआपें ॥
निरामय ॥ १२ ॥

म्हणजे दृश्य आणि दर्शन हे प्रकार हार-पले म्हणजे नाहींतसे झाले, म्हणजे अखंडित आणि निरामय म्हणजे विकाररहित असें आत्मस्वरूप आपोआप शिल्लक राहतें. (१२)

जाय लया सर्व दिसणें ॥
तेथें खुंटलें देखणें ॥
मग देखणें आपुलेया खुणें ॥
सदोदित ॥ १३ ॥

म्हणून दिसणारा तेवढा सर्व प्रकार आट-पला, म्हणजे द्रष्टेपणा आपोआप संपला. मग त्यानें आपलीच खूण सदोदित अवलोकन करावयाची. (१३)

तें आपणचि आपण ॥
अविनाश परिपूर्ण ॥
ऐसें ओळखावें परतोन ॥
स्वस्वरूप ॥ १४ ॥

तेंच आपलें आपण अविनाश, परिपूर्ण आत्मस्वरूप आहे असें अंतर्मुख दृष्टि करून ओळखावें. (१४)

नेणिवेच्या निरासें ॥
कारणशरीर नासे ॥
जाणिवही समरसे ॥
महाकारणीं ॥ १५ ॥

अशा प्रकारें नेणिवेचा निरास केला, म्हणजे त्याच्याबरोबर अज्ञानरूपी कारण-शरीराचाही निरास होतो, आणि जाणिव महाकारणदेहामध्यें समरस होते. (१५)

सुषुप्ति आणि तुर्या ॥
प्राज्ञ प्रत्यगात्मा अभिमानिया ॥
विश्व तैजस गेलिया ॥
जागृति स्वप्न कैंचें ॥ १६ ॥

तात्पर्य, प्राज्ञ आणि प्रत्यगात्मा, त्याच-प्रमाणें विश्व आणि तैजस हे अभिमान गेल्या-वर त्यांच्या अनुक्रमें सुषुप्ति, तुर्या, जागृति आणि स्वप्न या अवस्था तरी कोठून राहणार? (१६)

एवं देहचतुष्टयाचे निरासा ॥
करूनि जाणिजे अविनाशा ॥
तंव आपणचि स्वयंप्रकाशा ॥
ज्ञानघना ॥ १७ ॥

अशा प्रकारें देहचतुष्टयाचा (स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण यांचा) निरास केल्यावर अविनाश असें आत्मस्वरूप जाणलें म्हणजे आपले आपणच स्वयंप्रकाश ज्ञानघन शिल्लक राहतों. (१७)

सांडूनि आपुले जाणिवेसी ॥
जैं स्वस्थ उगा राहासी ॥
तैं काय आहे मग जाणसी ॥
निःसंगपणें ॥ १८ ॥

हें कसें जाणतां येईल असें म्हणशील, तर इंद्रियसंग सोडून निःसंग हो, आणि जाणिवेला बाहेर घालवून स्वस्थ रहा, म्हणजे मग हें काय स्वरूप आहे तें तुला जाणतां येईल. (१८)

जेव्हां जाणिवेतें सोडिलें ॥
तेव्हां स्फुरणचि खुंटलें ॥
उठले ठायीं लया गेलें ॥
तुजचिमाजी ॥ १९ ॥

अशा रीतीनें पाहूं लागलास, तर असें होईल कीं, जाणिव सोडून दिल्याबरोबर लगेच स्फुरण बंद होईल, आणि ज्या तुझ्या ठायीं पूर्वी तें स्फुरण उठलें होतें तेथेंच तें लयास जाईल. (१९)

जाणिव शून्यासहित ॥
तुजमाजीं सामावत ॥
तो तूं आत्मा अपरिमित ॥
स्वयंभमूर्ति ॥ २० ॥

स्फुरण लयाला गेलें म्हणजे होईल काय, कीं जाणिव शून्यासहित तुझ्यांत सामावली जाऊन तूं आत्मा अपरिमित स्वयंभमूर्ति आहेस असा प्रकाश होईल. (२०)

जेथें जाणिव नेणिव नाहीं ॥
शब्द निःशब्द कांहीं ॥
रूप अरूप हेंही ॥
नेणिजे सोय ॥ २१ ॥

त्या आत्मस्वरूपांत जाणिव नाहीं, नेणिव नाहीं, शब्द नाहीं, निःशब्द नाहीं, मग रूप-अरूपाची तर गोष्टच बोलावयाला नको. अर्थात् रूप-अरूप असला भागच त्या स्वरूपाच्या ठिकाणीं नाहीं. (२१)

देखतें ना अदेखण ॥
परकीय ना आपण ॥
स्मरण ना विस्मरण ॥
स्मृतिमात्र जें ॥ २२ ॥

त्याचप्रमाणें जेथें देखतें नाहीं, अदेखणेपणही नाहीं, परकीयपणा नाहीं, आपलेपणाही नाहीं, स्मरण नाहीं, विस्मरणही नाहीं, फक्त स्मृतिमात्र आहे. (२२)

वृत्ति ना निवृत्ती ॥
अपूर्ण ना पूर्ण स्थिती ॥
अभाव ना भावप्रतीती ॥
प्रतीतिमात्र जें ॥ २३ ॥

वृत्ति नाहीं, निवृत्तीही नाहीं, अपूर्ण नाहीं, पूर्ण स्थितीही नाहीं, अभाव नाहीं, भावही नाहीं, परंतु प्रतीतिमात्र आहे. (२३)

धरितां सोडितां न ये ॥
नाहीं आहे म्हणणें राहे ॥
अनुभवीं अनुभवितां न ये ॥
ठायीं नेणिजे ॥ २४ ॥

ह्या आत्मस्वरूपाचें आणखी एक लक्षण असें आहे कीं, या स्वरूपाला धरतां येत नाहीं व सोडतांही येत नाहीं. म्हणून जर हें स्वरूप आहे किंवा नाहीं असें म्हणावयाला जावें, तर बोलणेंच खुंटतें, आणि अनुभवी जो आहे, त्याला अनुभवांत त्याचा मुळांतच ठाव लागत नाहीं. (२४)

ऐसें हें अभ्यासणें ॥
अंतरींचें अंतरीं जाणणें ॥
निश्चळ स्वरूपीं स्थिरावणें ॥
कीजे मनाचें ॥ २५ ॥

अशा प्रकारचा हा अभ्यास आहे. म्हणजे त्याचा प्रकार असा आहे कीं, तो अंतरांतल्या अंतरांत जाणून मनाला निश्चल स्वरूपावर आणून स्थिर केलें पाहिजे. (२५)

स्वस्वरूप जाणिजे ॥
मग आलिंगोनि राहिजे ॥
स्वयेंचि चंचळपण न कीजे ॥
कल्पनाव्यापार ॥ २६ ॥

परंतु असा अभ्यास करीत असतां होत असतें काय, कीं स्वस्वरूप जाणावें अथवा ओळखावें, आणि त्याला आलिंगन दिल्याप्रमाणें समरस होऊन रहावें, स्वतःच चंचलता उत्पन्न करून कल्पनाव्यापार सुरू करूं नये. (२६)

ऐसें करितां मन विरमे ॥
विषयव्यापार शमे ॥
मग चित्त रमे ॥
कांहीं कांहीं स्वस्वरूपीं ॥२७॥

असें केल्यानें मन स्वस्थ होतें आणि विषयव्यापार शमन होऊन स्वस्वरूपाच्या ठिकाणीं कांहीं कांहीं वेळ चित्त रममाण होतें. (२७)

विसरे प्रकाशे स्वरूप ॥
हारपे सांपडे आपेंआप ॥

अशा वेळीं स्वस्वरूपाचा क्षणभर विसर पडेल, क्षणभर प्रकाशित होईल, आपोआप

ऐसा करितां साक्षेप ॥
मन स्थिरावे ॥ २८ ॥

गुप्त होईल, केव्हां केव्हां आपोआपच सांपडेल, असाच अभ्यास चालविला असतां मन स्थिरावत जातें. (२८)

निवांत भोगी स्वरूप ॥
डुल्लत आनंदें आपेंआप ॥
मग तया सुखाचें माप ॥
कवण करी ॥ २९ ॥

अशा रीतीनें मन एकदां स्थिरावलें, म्हणजे निवांत स्वरूपभोग प्राप्त होऊन तें आनंदानें आपोआप डुलूं लागतें, मग त्या सुखाचें मोजमाप तरी कोणाला करतां येणार आहे ? (२९)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अज्ञानखंडनं नाम एकादशप्रकरणं संपूर्णम् ॥ ११ ॥

---

## प्रकरण १२ वें

## स्वानुभवसुखवर्णन

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

स्वेदकंपादि उठती ॥
अष्ट सात्त्विक भाव प्रगटती ॥
पावे साम्राज्यसंपत्ती ॥
रंक जैसा ॥ १ ॥

स्वानुभवसुख प्राप्त झालें असतां त्याचीं लक्षणें म्हणजे स्वेदकंपादि अष्ट सात्विक भाव प्रगट होऊं लागतात. आणि एकाद्या रंकाला साम्राज्यसंपत्ति प्राप्त झाली असतां त्याची जशी स्थिति होते, त्याप्रमाणें त्याची स्थिति होते. (१)

चित्त चैतन्यीं हारपे ॥
उरिजे ज्ञप्तिस्वरूपें ॥
अखंडित आपआपें ॥
ब्रह्मानंद ॥ २ ॥

स्वानुभवसुखप्राप्तीचे वेळीं चित्त चैतन्यामध्यें हारपून जाऊन आपण ज्ञप्तिस्वरूप शिल्लक रहातों, तेव्हां आपोआप अखंड ब्रह्मानंद प्राप्त होतो. (२)

तया सुखाचेनि समरसें ॥
पावे सुलीन दशे ॥
तें बोलावें कैसें ॥
अनुभवी जाणती ॥ ३ ॥

त्या सुखाच्या ठायीं जीव समरस झाला, म्हणजे त्यांतच सुलीन दशा प्राप्त होते. आणि जे अनुभवी आहेत, तेच मात्र त्या सुलीन दशेंतील सुख जाणतात. तें बोलून दाखवितां येण्यासारखें नाहीं. (३)

जैसें अमृत चाखे आपुले चवी ॥
तैसें स्वसुख अनुभवी ॥
तेथें कोण आठवी ॥
संसारासी ॥ ४ ॥

अमृतानेंच जशी स्वतःची रुचि समजावयाची, त्याप्रमाणें स्वसुखानुभव स्वतःच घेऊं लागलों, म्हणजे त्या स्वसुखानुभवांत संसाराची आठवण देखील होत नाहीं. (४)

वोळे स्वानंदाचा घन ॥
दाटे सुख परिपूर्ण ॥
तयामाजी विवेक सुजाण ॥
हारपोनि जाय ॥ ५ ॥

मग स्वानंदाचा मेघच वर्षूं लागतो, परिपूर्ण सुखाची गर्दी होऊन जाते, आणि त्या सुखाच्या गर्दीमध्यें सुजाण विवेक सुद्धां हारपून जातो. (५)

अहंता स्वरूपीं गळे ॥
विषयतृष्णा मावळे ॥
इंद्रियांचे लळे ॥
क्रियेविण पूर्ण होती ॥ ६ ॥

तसेंच स्वस्वरूपदर्शन झाल्याच्या योगानें अहंता नाहींशी होते, विषयांवरील इच्छा मावळून जाते, आणि क्रियेवांचून इंद्रियांचे लळे पुरतात. (६)

महासुखाचे अरुवारीं ॥
आलिंगी स्वानुभूती सुंदरी ॥
ज्ञानमात्र इयापरी ॥
स्वस्वरूप भोगी ॥ ७ ॥

या महासुखाच्या अरुवारीं म्हणजे घरांत स्वानुभवी जो आहे, तो अनुभूतिनामक सुंदरीचें आलिंगन घेतो. म्हणजे अशा प्रकारानें केवळ ज्ञानमात्र अशा स्वस्वरूपाचा उपभोग घेतो. (७)

निरसितां नेणिव ॥
स्वरूपीं समरसे जाणिव ॥
मग एकछत्री राणिव ॥
योगियासी ॥ ८ ॥

नेणिव म्हणजे अज्ञान नाहींसें होण्याबरोबर स्वरूपामध्यें जाणिव समरस होऊन जाते, आणि स्वानुभवी योग्याला एकछत्री राज्य प्राप्त होतें. (८)

सदा स्वानंदाचे सोहळे ॥
विषयविजाती वितळे ॥
स्वरूपसुखाचेनि मेळें ॥
इंद्रियां तृप्ती ॥ ९ ॥

मग त्या एकछत्री राज्यांत सदासर्वकाळ स्वानंदसोहळे चालू होतात, आणि स्वरूपसुखाच्या गर्दीनें इंद्रियांची तृप्ति होऊन, त्यांच्या अनेक जातींच्या विषयवासना वितळूनच जातात. अर्थात् नाहींतशा होतात. (९)

परमसुखाचेनि भरें ॥
एकही स्फूर्ति न स्फुरे ॥
कार्यजाती विसरे ॥
निमिषांत ॥ १० ॥

आणखी असा प्रकार होतो कीं, या परमसुखाच्या भरानें एका क्षणार्धांत सर्व प्रकारचीं कर्में विसरून एकही स्फूर्ति स्फुरण पावत नाहीं. (१०)

करूनि यज्ञाचिया कोडी ॥
उभविती स्वर्गाची गुढी ॥
तें सुख कीजे कुर्वंडी ॥
या ब्रह्मसुखासी ॥ ११ ॥

या स्वानुभवसुखाची महती इतकी मोठी आहे कीं, कोट्यवधि यज्ञ करून स्वर्गांत गुढी उभी करणारांचें सुख सुद्धां या ब्रह्मसुखावरून कुर्वंडी करून म्हणजे ओंवाळून टाकण्यासारखें आहे. (११)

आनंद आनंदासी घोंटी ॥
बोलतां परेसी पडे मिठी ॥
मुक्यानें सुखाच्या गोष्टी ॥
केविं कीजे ॥ १२ ॥

या ब्रह्मसुखप्राप्तींत आनंदच आनंदाचे घुटके घेतो. बोलतांना परावाचाही बंद पडते, तर मग मुक्यानें या सुखाच्या गोष्टी कशा करतां याव्या ? (१२) करतांच येत नाहींत.

खुंटलें मनाचें जाणणें ॥
तें सुख अनुवादावें कवणें ॥

कारण या सुखाचा प्रकार मनालाच जर आकलन करतां येत नाहीं, तर तेथें अमुक

हें अनुभवी तोचि जाणे ॥
इतरां टकमक ॥ १३ ॥

प्रकारचें सुख आहे असें तरी कोणाला सांगतां येणार आहे? जो अनुभवी असेल, त्यालाच मात्र हा सुखसोहाळ्याचा प्रकार कळतो. बाकी इतरांनीं नुसतें टकमक पहातच राहावें. अर्थात् इतरांना कांहीं समजत नाहीं. (१३)

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते स्वानुभवसुखवर्णनं नाम द्वादशप्रकरणं संपूर्णम् ॥ १२ ॥**

---

## प्रकरण १३ वें

## मुक्तिरहस्य

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

ऐशी पावोन योगखूण ॥
स्वानंद भोगितो परिपूर्ण ॥
तया योगिया न घडे शीण ॥
संसाराचा ॥ १ ॥

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें योगाची गुरुकिल्ली प्राप्त झाली म्हणजे योगी स्वानंदभोगांत परिपूर्ण अथवा निमग्न होऊन जातो व त्याला संसाराचा शीण घडत नाहीं. (१)

झाले ब्रह्म आपण ॥
योगी सहज परिपूर्ण ॥
सदा स्वानंदनिमग्न ॥
ज्ञप्तिमात्र ॥ २ ॥

अशा रीतीनें योगी स्वतः सहजच परिपूर्ण ब्रह्म झाले म्हणजे त्या योगानें सदा ज्ञानरूप स्वानंदांत मग्न होतात. (२)

संकल्प आणि विकल्प ॥
दोन्ही न दिसती अल्प ॥
सुख पावले अमूप ॥
म्हणोनियां ॥ ३ ॥

त्या योगानें अपरिमित सुखप्राप्ति होत असते, म्हणून अल्प संकल्प आणि विकल्प हे त्यांना दिसेनातसेच होतात. (३)

साधन असाधन खुंटलें ॥
करणें अकरणें मोडलें ॥
आपणचि ते झाले ॥
परब्रह्म ॥ ४ ॥

त्या योग्यांना साधन, असाधन, व करणें, अकरणें यांपैकीं कांहींच रहात नाहीं. अशा रीतीनें ते आपणच परब्रह्म होऊन गेले. (४)

नाहीं धारणा ध्यान ॥
नाहीं समाधि आसन ॥
चुबुकुळित आनंदघन ॥
आपणामाजी ॥ ५ ॥

कोणाचें ध्यान किंवा धारणा त्यांना कर्तव्य राहात नाहीं; आणि समाधियोग अथवा आसनयोग यांपैकींही त्यांना कांहीं कर्तव्य राहात नाहीं. कारण ते आपल्यामध्येंच आनंदरूपी पाण्यानें परिपूर्ण भरून ओथंबलेले असे मेघ होऊन राहतात. (५)

भुवनत्रयीं क्रीडती ॥
स्वइच्छा वर्तती ॥
अखंड स्फुरे ज्ञप्ति ॥
म्हणोनियां ॥ ६ ॥

आणि त्यांच्या ठिकाणीं ज्ञानाची अखंड स्फूर्ति असल्याकारणानें ते स्वइच्छेप्रमाणें वर्तन करून भुवनत्रयांत क्रीडा करितात. (६)

विधिनिषेधाची कडसणी ॥
न वर्ते जयां अंतःकरणीं ॥
पापपुण्याची काहाणी ॥
तेही नेणती ॥ ७ ॥

कारण त्यांच्या अंतःकरणांत विधीची अथवा निषेधाची बाबच रहात नसून पापपुण्यांच्या गोष्टी ते जाणतच नाहींत. म्हणजे त्या त्यांच्यापुढें येतच नाहींत. (७)

शुभाशुभ फळें ॥
न बाधती कवणे वेळे ॥
ते सर्वांपासून सुटले ॥
जीवन्मुक्त ॥ ८ ॥

त्यामुळें शुभ अथवा अशुभ फलप्राप्तीपासून त्यांना कोणत्याच प्रकारचा विकार होत नाहीं. कारण ते योगी सर्वांपासून सुटलेले असून जीवन्मुक्त बनलेले असतात. (८)

बंधमोक्षाची वार्ता ॥
नायकती सर्वथा ॥
सहजचि ध्याती शाश्वता ॥
अखंडितासी ॥ ९ ॥

अर्थात् त्यांचें ध्यान सहजींच अखंडित शाश्वतापाशींच लागून राहिलें असल्याकारणानें, बंध आणि मोक्ष यांची वार्ताच त्यांच्या कानावर जात नाहीं. (९)

जे मनापासोनि सुटले ॥
तयां संशय नुरले ॥
करणीय अकरणीय गेलें ॥
सर्व कर्म ॥ १० ॥

कारण, मनाच्या चेष्टा बंद करून जे पुढें गेले, त्यांना कांहीं संशयच उरत नसल्याकारणानें करणीय आणि अकरणीय अशा प्रकारचें कोणतेंही कर्म त्यांच्याजवळ रहात नाहीं. (१०)

ऐसे होऊनि निभ्रांत ॥
कळों न देती आपुला अंत ॥
लोकांमाजी दावीत ॥
भक्तिरहस्य ॥ ११ ॥

अंतःकरणांत अशा प्रकारें निभ्रांत झालेले ते योगी आपला अंत लोकांना कळूं देत नाहींत. लोकांमध्यें ते भक्तिरहस्याचा प्रचार करीत असतात. (११)

भक्ति ज्ञान वैराग्य पाहीं ॥
करूनि दाविती आपुले देहीं ॥
जगासी लाविती सोयी ॥
तारक ते ॥ १२ ॥

तर भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि प्रकार आपल्या देहानें प्रत्यक्ष आचरून दाखवून ते योगी जगाला तारक अशा मार्गालाच लावीत असतात. (१२)

भोगिती स्वरूपरहस्य ॥
करितां सद्गुरूचें दास्य ॥
परि भेद नाहीं सामरस्य ॥
जाणती जीवेश्वराचें ॥ १३ ॥

सद्गुरूचें दास्य म्हणजे सेवा करीत असतां जीव आणि शिव या दोहोंमध्यें कांहीं भेद नसून पूर्ण समरसता आहे, असें जें स्वरूप-रहस्य, त्याचा उपभोग हे योगी घेत असतात. (१३)

प्रेमें स्फुंदती नित्य ॥
स्मरणविस्मरणेंविण नेमस्त ॥
क्षणक्षणां उच्चारीत ॥
नाम गुरूचें ॥ १४ ॥

अशा प्रकारें ते योगी सद्गुरूच्या सेवा-धर्मांत निमग्न असतां सदोदित प्रेमानें स्फुंद-स्फुंदून स्मरण-विस्मरणाशिवाय नेमानें क्षण-क्षणीं सद्गुरूच्या नामाचा तोंडानें उच्चार करीत असतात. (१४)

गुरुपरमेश्वरऐक्यता ॥
तद्रूप जाणोनि भजतां ॥
सन्मान देती संतां ॥
अतिप्रीतीनें ॥ १५ ॥

तसेंच ते योगी सद्गुरु व परमेश्वर हे दोन्ही पूर्ण एकस्वरूपच आहेत असें जाणून संतमंडळाला अत्यंत प्रीतीनें सन्मान देऊन भजतात. (१५)

आणि विश्वामाजी ईश्वरू ॥
एकचि व्यापक सद्गुरू ॥
म्हणोनि सर्वां भूतीं आदरू ॥
करिती ते ॥ १६ ॥

योगी अशा प्रकारचें वर्तन करतात त्याचें कारण असें आहे कीं सर्व विश्वामध्यें ईश्वर हाच एक व्यापक सद्गुरु असल्यामुळें सर्व भूतमात्रीं ते आदरपूर्वक वर्तन करतात. (१६)

हृदय जयांचें कोमळ ॥
सदा शुचिष्मंत निर्मळ ॥
निरंतर आचारशीळ ॥
पवित्रपणें ॥ १७ ॥

कारण त्यांचें हृदय अतिशय कोमळ असतें, आणि ते सदासर्वकाळ शुचिर्भूत, निर्मळ आणि पवित्रपणानें निरंतर आचारशील असे असतात. (१७)

न पाहती मानापमान ॥
निंदा स्तुती समाधान ॥
धैर्यपणें मन ॥
नांदत जयांचें ॥ १८ ॥

ते आपला मान, अपमान कांहीं पहात नसून निंदा-स्तुतीची किंमत त्यांच्याजवळ सारखीच असते. त्यांचें मन धैर्यानें जसें कांहीं भरलेलेंच असतें. (१८)

सुख दुःख न गणीं ॥
समाधान लाभ हानी ॥
उदार ते अंतःकरणीं ॥
न गुंतती कोठें ॥ १९ ॥

सुखदुःखांची त्यांना परवाच नसते. लाभ आणि हानि हे प्रकार त्यांच्याजवळ नसून सदा समाधानवृत्ति असते आणि ते कोठेंही गुंतत नसल्यामुळें अंतःकरणाचे ते मोठे उदार असतात. (१९)

सदा विवेकीं चित्तवृत्ती ॥
पडों न देती विस्मृती ॥
सावधान अहोराती ॥
आत्मस्वरूपीं ॥ २० ॥

त्यांची चित्तवृत्ति नेहमीं विवेकामध्येंच स्थिर असल्याकारणानें ते आपल्याला विस्मृति कधींही होऊं देत नाहींत. आणि म्हणूनच आत्मस्वरूपाच्या ठायीं ते अहोरात्र सावधान असतात. (२०)

कां धरी पिशाचलीला ॥
तरी होय जगावेगळा ॥
लोकां न दाखवी डोळां ॥
शहाणपण ॥ २१ ॥

एकादा योगी पिशाचलीला धारण करून जगाच्या वेगळा होतो. त्यांत मुद्याची गोष्ट इतकीच असते कीं आपलें शहाणपण लोकांच्या डोळ्यांना दिसूं नये, असें त्याला वाटतें. (२१)

इत्यादि आचार दाविती ॥
फलापेक्षा न भाविती ॥
लोकांसी देख लाविती ॥
वर्तती ऐसें ॥ २२ ॥

योगी लोक अशा प्रकारचे बाह्याचार दाखवून फलापेक्षा न धरितां आपल्या वर्तमाचा कित्ता लोकांपुढें ठेवतात. (२२)

विश्वसाक्षी योगिराणा ॥
जाणे सर्वांतरींच्या खुणा ॥
परी तो वाटे जना ॥
वेडियाऐसा ॥ २३ ॥

तो योगिराज विश्वसाक्षी असल्यानें सर्वांच्या अंतरांतल्या खुणा जाणतो, परंतु तो आचारविचारांच्या वर्तनानें लोकांना वेड्यासारखा दिसतो. (२३)

असे तरी लोकांमाजी ॥
परी कर्मक्रिया सर्व त्यजी ॥
राहे सहजासहजीं ॥
निष्कर्मपणें ॥ २४ ॥

योगी जरी लोकांतच राहातो, तथापि सर्व कर्मक्रियांचा त्याग करून निष्कर्मपणानें तो सहजासहजीं जगांत असतो. (२४)

आपण एक सर्वेश्वरू ॥
कोणा सांगेना व्यवहारू ॥
क्रिया कर्म न सांगे करूं ॥
नाथिलेंचि ॥ २५ ॥

तो आपण स्वतः एक सर्वेश्वरस्वरूप बनून राहिलेला असतो. तो कोणाला व्यवहार सांगत नाहीं, अथवा नसतीं खोटींच क्रियाकर्मे करण्याला सांगत नाहीं. (२५)

उग्र खळता दावीतसे ॥
तेणें लोक हांसतसे ॥
हेंही तया नाहीं पिसें ॥
अद्वैतपणें ॥ २६ ॥

तसेंच तो आपल्या अंगांत उग्र खलता म्हणजे अत्यंत मूर्खपणा दाखवीत असल्याकारणानें लोक त्याला हंसतात, तथापि तो अद्वैतपणानें वागणारा असल्याकारणानें त्याला हंसल्याबद्दल कांहींच वाटत नाहीं. (२६)

ऐशिया स्थिती राहावें ॥
स्वरूप जाणोनि भोगावें ॥
जन उद्धरावे कीं त्यजावे ॥
न स्मरे तो ॥ २७ ॥

अथवा स्वरूप जाणून स्वरूपभोगांत असेंच रहावें आणि जनाचा उद्धार करावा, अथवा जनाचा त्याग करावा, या गोष्टीही त्याला स्मरत नाहींत. (२७)

विश्व आपण भोगो न भोगो ॥
परी स्वरूप तया सांगों ॥
हें कांहीं न दे लागों ॥
आपणाकडे ॥ २८ ॥

विश्व स्वतः आत्मस्वरूपाचा उपभोग घेवो अथवा न घेवो, तथापि आपलें तें स्वरूप लोकांना सांगावें हा संबंध देखील तो आपल्याकडे लागूं देत नाहीं. (२८) कारण,

| | |
|---|---|
| विश्वाचा दाहो न लागे अंगा ॥<br>तो द्वंद्वातीत पैं गा ॥<br>एकदेशिया जगा ॥<br>न पाहे योगी ॥ २९ ॥ | तो योगी "द्वंद्वातीत" अर्थात् अद्वैत झाला असल्याकारणानें तो विश्वाचा 'दाहो' म्हणजे उपसर्ग आपल्याकडे येऊं देत नाहीं. तो योगी ह्या एकदेशी (मायामय) जगाल पहात नाहीं. (२९) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते मुक्तिरहस्यनिरूपणं नाम त्रयोदशप्रकरणं संपूर्णम् ॥ १३ ॥

---

## प्रकरण १४ वें

## साक्षात्कार

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

| | |
|---|---|
| तूं संशय न धरीं ॥<br>मुक्त वर्तती दोहीं परी ॥<br>परी तूं अभ्यास करीं ॥<br>सांगितला ऐसा ॥ १ ॥ | जे मुक्त आहेत, ते व्यवहारदृष्ट्या अतिशय चोखपणानें वागतात व कांहीं पिशाचवृत्तीनेंही वागतात. असे मुक्तवर्तनाचे दोन प्रकार दिसतात. तथापि तूं मनांत संशय न धरितां सांगितल्याप्रमाणें अभ्यास करीत जा. (१) |
| तैसा सहजचि अससी ॥<br>परी आलें पाहिजे प्रत्ययासी ॥<br>मग तूं ज्ञानीच होसी ॥<br>जैसा तैसा ॥ २ ॥ | अभ्यास करावयाचें कारण इतकेंच कीं, तूं साहजिकच ब्रह्मरूप आहेस हें खरें, परंतु तें प्रत्ययाला आलें पाहिजे. तें स्वरूप प्रत्ययाला येऊं लागलें म्हणजे तूं ज्ञानीच होशील. (२) |
| पाहें पां शेंदाडें पिकलीं ॥<br>तीं काय देंठींहून सोडविलीं ॥ | याला उदाहरण शेंदाडांचेंच. तीं देंठापासून सुटलीं म्हणजे पिकलीं असें समजण्याचा जसा खुणेचा प्रकार आहे, त्याचप्रमाणें |

तैशी दशा जरी झाली ॥
तरी राहिलें ध्यान ॥ ३ ॥

स्वरूप प्रत्ययाला येऊं लागलें म्हणजे तो ज्ञानी होतो. तथापि ज्ञानी जरी झाला, तरी ध्यानमार्ग राहतोच, अर्थात् त्याला ध्यानयोग केलाच पाहिजे. (३)

तंववरी सांगितलिया रीतीं ॥
स्वरूप ध्याइंजे अतिप्रीतीं ॥
तरीच साधे परमप्राप्ती ॥
सत्य जाण ॥ ४ ॥

म्हणून पुरा अभ्यास होईपर्यंत पूर्वी सांगितल्याप्रमाणें जर अत्यंत प्रीतीनें स्वरूपध्यान केलें, तर खात्रीनें परमप्राप्तीचा लाभ होईल. (४)

नित्य करावा ऐसा नेम ॥
पडों न द्यावा संसारभ्रम ॥
धरावा स्वरूपाचा काम ॥
साधनपंथ ॥ ५ ॥

म्हणून संसाराचा भ्रम होणार नाहीं, असाच नित्यनेम करावा. आणि अशा तऱ्हेनें स्वरूपप्राप्तीविषयीं कामना धरून साधनपंथाला लागावें. (५)

हें नित्य श्रवण करावें ॥
मनन निदिध्यासें अनुभवावें ॥
आळस करून न दवडावें ॥
आयुष्य वृथा ॥ ६ ॥

साधनपंथ म्हटला म्हणजे स्वरूपप्राप्तीविषयीं जे जे प्रकार सांगितले आहेत, त्यांचें श्रवण करून मनन करावें; आणि तोच निदिध्यास करून त्याच्यायोगानें स्वरूपसुख अनुभवावें. आळस करून आयुष्याचा व्यर्थ व्यय करूं नये. (६)

येविषयीं जो आळसी ॥
तया परमप्राप्ती न होय कल्पांतेंसीं ॥ तो सद्गुरूचा उपदेशी ॥
म्हणोंचि नये ॥ ७ ॥

कारण याविषयीं जर कोणी आळस करील, तर त्याला कल्पांतींही परमप्राप्ति होणार नाहीं, आणि अशा आळशाला सद्गुरूचा उपदेशी (शिष्य) असें कधींही म्हणूं नये. (७)

आतां असो बहु बोलणें ॥
श्रीगुरूसी धरीं जीवें प्राणें ॥
नाहीं सार तयाविणें ॥
अन्य कांहीं ॥ ८ ॥

आतां थोडक्यांत इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं, श्रीसद्गुरूला जीवप्राणानें भजत जा. कारण त्याच्यावांचून जगांत सार असें दुसरें कांहींच नाहीं. (८)

तयाचे वचनीं राहीं ॥
करूं नको येर कांहीं ॥
तरी अनायासें स्वरूप पाहीं ॥
पावशी तूं ॥ ९ ॥

म्हणून आणखी कांहीं न करतां एका सद्गुरुवचनाप्रमाणेंच वागत जा. म्हणजे श्रमावांचून तूं स्वरूपाला जाऊन पोहोंचशील. (९)

वृद्धि पावे गुरुकृपा ॥
ऐशिये स्थितीं राहें पां ॥
गुरु कष्टी होय बापा ॥
ऐसा न वर्ते ॥ १० ॥

याकरितां सद्गुरुकृपा वाढेल अशा स्थितीनें रहा. परंतु श्रीगुरु कष्टी होतील अशा तऱ्हेचें वर्तन मात्र कधींही करूं नकोस. (१०)

गुरुमहिमा अपारू ॥
गुरु तो परात्परू ॥
तुज न कळे म्हणोनि परिहारू ॥
देऊन सांगों ॥ ११ ॥

बाबा, गुरु परात्पर म्हणजे परावाचेच्याही पलीकडचा असल्याकारणानें गुरुमहिमा अपार आहे. त्याच्या महिमेचा अंतच लागत नाहीं. तो तुला न कळणारा असल्याकारणानें उदाहरणें देऊन सांगावा लागतो. (११)

आतां तन मन धन ॥
करीं सद्गुरूसी समर्पण ॥
नाहीं तयाविण ॥
अन्य दैवत जगीं ॥ १२ ॥

गुरुवांचून अन्य दैवतच जगांत कोणी नाहीं. एवढ्याकरितां कर काय, कीं तनु, मन आणि धन हीं सद्गुरूला अर्पण कर. (१२)

गुरु तत्पद शिव ॥
शिष्य त्वंपद जीव ॥
म्हणोनि तयाचे चरणीं भाव ॥
धरीं ऐक्यतेचा ॥ १३ ॥

गुरु म्हणजे तत्पदवाचक शिव, आणि शिष्य म्हणजे त्वंपदवाचक जीव असा प्रकार असल्यानें श्रीगुरुचरणांच्या ठिकाणीं दोन्ही पदांच्या ऐक्यतेचा भाव धर. (१३)

गुरु तत्पद सागरू ॥
शिष्य त्वंपद तरंगाकारू ॥

म्हणजे होईल काय, कीं तत्पदवाचक शिव-गुरु सागर असल्यानें त्वंपदवाचक जीवाला ते तरंगाकार करतील, आणि मग

दोन्ही हारपोनि ब्रह्म निर्विकारू ॥
आपण होइजे ॥ १४ ॥

सागर आणि तरंग म्हणजे शिव आणि जीव हे दोन भेद हारपून जाऊन तूं स्वतःच निर्विकाररूप ब्रह्म होशील. (१४)

गुरुभयें प्रेम वाहासी ॥
तरी अवश्य स्वरूप पावसी ॥
कीटकभयें आळीसी ॥
कैसें झालें ॥ १५ ॥

गुरूच्या भयानें (त्याचें मन दुखावेल या भीतीनें) तूं जर प्रेमानें वागशील तर खात्रीनें निर्विकार ब्रह्मस्वरूप होशील. कीटक म्हणजे भ्रमर याचें नित्य भय बाळगल्याच्या योगानें आळी म्हणजे एक प्रकारचा कुंभारीण नांवाचा किडा भ्रमरच होऊन जातो. त्याप्रमाणें प्रेमानें तूं गुरुभयांत रहा. (१५)

आळीसी कीटकता ॥
तैसी गुरु देईल सायुज्यता ॥
मग सुखिया होशी तत्त्वतां ॥
स्वरूपीं रमशी ॥ १६ ॥

म्हणजे कुंभारणीला जशी भ्रमरता प्राप्त झाली, त्याचप्रमाणें सद्गुरु प्रेमभयाच्या कारणानें तुला सायुज्यता देतील. त्या सायुज्यप्राप्तीच्या योगानें तुला सुख प्राप्त होऊन, तूं आपल्या स्वरूपींच रममाण होशील. (१६)

तत्त्वतां स्वरूपीं भेद नाहीं ॥
परी तें ध्यानैकगम्य पाहीं ॥
मग अनुभवें सुखिया होईं ॥
तरसी भवभय ॥ १७ ॥

खरें पाहतां स्वरूपांत भेद नाहीं; परंतु स्वरूपांत भेद नाहीं हें ज्ञान ध्यानानें-सर्व वृत्तींचें ऐक्य करून-मिळवावें लागतें. मग ऐक्याच्या अनुभवांत परमप्राप्ति होऊन भवभयापासून अर्थात् संसारभयापासून तूं मुक्त होशील. (१७)

हें शास्त्र गोप्य करावें ॥
कवणा स्फुट न सांगावें ॥
तुझें तुवां अनुभवावें ॥
गुरुगम्य हें ॥ १८ ॥

हें ब्रह्मविद्याशास्त्र गोप्य ठेवावें. स्पष्टपणानें कोणाला कधींही सांगूं नये. परंतु या गुरुगम्य म्हणजे गुरूपासून प्राप्त होणाऱ्या वस्तूचा अनुभव स्वतःच घेऊन पहावा. (१८)

पशुजना श्रवणीं घालिसी ॥
तरी काय सिद्धि होय तयासी ॥
सद्भाव देखोनि कृपा करिसी ॥
तरी निर्वाहकु पाहिजे ॥ १९ ॥

पशूप्रमाणें वागणाऱ्या लोकांना जर हें शास्त्र शिकवूं लागलें, तर या शास्त्राची त्यांना काय सिद्धि होईल ? परंतु कोणाचा सद्भाव पाहून हें गुरुगम्य शास्त्र सांगण्याची त्याजवर कृपा करावी असें वाटलें तर तो सांगितल्याप्रमाणें वागणारा पाहिजे. (१९)

जैसी गुरुमार्गींची परवडी ॥
तैसी असावी गुरुपदाची गोडी ॥
तरी प्रकाश होतां अर्धघडी ॥
न लागे बापा ॥ २० ॥

गुरुमार्गाची जशी परंपरा असेल त्याचप्रमाणें गुरुपदावर प्रीति ठेविली असतां आत्मज्ञानाचा प्रकाश होण्यास अर्ध्या घटकेचा देखील अवकाश लागत नाहीं. (२०)

गुरुसांप्रदायाची वाट ॥
न धरितां करिसील प्रगट ॥
तरी गुज घेऊनि चावट ॥
होतील बहु ॥ २१ ॥

परंतु गुरुसांप्रदायाची वाट धरिल्यावांचून जर हें शास्त्र कोणाला प्रगट करशील, तर अभ्यास करून अनुभव न पाहतां त्यांतलें गुज म्हणजे गुह्य ऐकून घेऊन बरेच लोक चावट मात्र होतील. (२१)

यालागीं हृदयीं गुप्त राख ॥
स्वयें परमामृत चाख ॥
सर्व योगियांचा तिलक ॥
होशील तूं ॥ २२ ॥

याजकरतां हें शास्त्र हृदयामध्यें गुप्त राखून स्वतः परमामृताची रुचि घे, म्हणजे सर्व योग्यांचा अग्रेसर तूंच होशील. (२२)

परमामृत ग्रंथ प्रमाण ॥
केलें परमार्थाचें कथन ॥
जयासी पाहिजे गुरुखूण ॥
तेणें हाचि पाहावा ॥ २३ ॥

परमामृत ग्रंथ प्रमाणभूत आहे. कारण त्यांत परमार्थाचें कथन केलें आहे. ज्याला गुरुखूण पाहिजे असेल, त्यानें ह्याच परमामृत ग्रंथाचा अभ्यास अवश्य करावा. (२३)

हेंचि गुरुबीजकथन ॥
म्हणोनि करावें जतन ॥
सेवूनि सद्गुरूचे चरण ॥
सुखिया होइजे ॥ २४ ॥

हाच ग्रंथ गुरुबीजाचें कथन असल्याकारणानें त्याचें जतन करावें, आणि सद्गुरुचरणाची सेवा करून सुखी व्हावें. (२४)

म्हणे मुकुंदराज योगिया ॥
ह्या बुद्धी जो अनुभविया ॥
तो पाहे परतोनियां ॥
आपुलें स्वरूप ॥ २५ ॥

योगिराज मुकुंदराजांचा असा आशीर्वाद आहे कीं, वर सांगितलेल्या बुद्धीनें जो या ग्रंथाचा अनुभव घेईल, तो मागें पाहून अर्थात् प्रत्यगावृत्ति करून आपण आपलें स्वतःचें स्वरूप पाहील. म्हणजे तो आपल्या स्वस्वरूपीं मिळेल. (२५)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते साक्षात्कारो नाम
चतुर्दशप्रकरणं संपूर्णम् ॥ १४ ॥

